


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २४६ जुलै-सप्टें. ८८

दिवाळी अंक २४७ ऑक्टो.-डिसें. ८८

अंक २४८ जाने.-मार्च ८९

" २४९ एप्रिल-जून. ८९

संपादक - शंकर सारडा

अनुक्रमणिका



# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



जुलै–सप्टेंबर १९८८

अनुक्रमणिका

महाराष्ट्र राज्य साहित्य-संस्कृती मंडळ पुरस्कृत
महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

(अंक २४६ ▪ जुलै-सप्टेंबर १९८८)



मुद्रणस्थळ
स्मिता प्रिंटर्स
१०१९, सदाशिव पेठ, पुणे ३०

मुद्रक-प्रकाशक
डॉ. गं. ना. जोगळेकर
कार्यवाह, म. सा. परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०

मूल्य दहा रुपये

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

## अनुक्रमणिका

# संपादकीय

जून १९८८ मध्ये महाराष्ट्र साहित्य परिषदेची त्रैवार्षिक निवडणूक झाली. नवे कार्यकारी मंडळ अधिकारावर आले. राजेंद्र वनहट्टी (कार्याध्यक्ष), म. श्री. दीक्षित (कोषाध्यक्ष), डॉ. व. दि. कुलकर्णी, डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. वीणा देव, ज्योत्स्ना देवधर, डॉ. प्र. ल. गावडे (पुणे विभाग), प्रा. पुरुषोत्तम पाटील (जळगाव–धुळे), प्रा. चंद्रकुमार नलगे (कोल्हापूर–सोलापूर), प्रा. लीला गोविलकर (नाशिक–अहमदनगर), शंकर सारडा (सातारा–सांगली) हे सर्वजण निवडणुकीत यशस्वी झाले. श्री. चिंतामण जोशी (ठाणे–रायगड) व डॉ. वसंत सावंत (रत्नागिरी-सिंधुदुर्ग) हे अविरोध निवडून आले.

कार्यकारी मंडळाच्या पहिल्या सभेत प्रा. ग. प्र. प्रधान यांची म. सा. परिषदेच्या अध्यक्षस्थानी निवड करण्यात आली. डॉ. यू. म. पठाण (औरंगाबाद), डॉ. हे. वि. इनामदार (पुणे) व श्री. नारायण सुर्वे (मुंबई) यांची उपाध्यक्षपदी नियुक्ती करण्यात आली. श्री. राजा फडणीस आणि डॉ. ललिता कुंभोजकर यांना स्वीकृत सदस्य म्हणून घेण्यात आले. डॉ. गं. ना. जोगळेकर, श्रीमती ज्योत्स्ना देवधर आणि श्री. चिंतामणी जोशी यांची कार्यवाहपदासाठी निवड करण्यात आली.

महाराष्ट्र-साहित्य पत्रिकेचे संपादक म्हणून शंकर सारडा यांची निवड करण्यात आली.

ही नवी कार्यकारिणी अनुभवी, उत्साही, वाङ्मयप्रेमी आणि उपक्रमशील आहे. परिषदेचा दैनंदिन कारभार तर त्यायोगे कार्यक्षमरीत्या चालेलच; नवनव्या योजना हाती घेऊन त्याही कल्पकतेने आणि जागरूकपणे राबवण्यातही ती प्रयत्नशील राहील. परिषदेच्या कामाला ती नवी गती देईल; साहित्यविषयक चळवळीला नवी ऊब देईल, अशी आशा वाटते. या नव्या कार्यकारिणीचे हार्दिक अभिनंदन.

**नव्या वास्तूची निकड**

परिषदेला नव्या प्रशस्त वास्तूची आता निकड भासत आहे; विद्यमान वास्तू

अनुक्रमणिका

परिषदेच्या विविध उपक्रमांच्या पूर्ततेसाठी अपुरी पडत आहे. पुणे महापालिकेच्या सहकार्याने सोयीस्कर जागा मिळवून, तेथे परिषदेच्या भावी योजनांच्या दृष्टीने परिपूर्ण ठरेल अशा वास्तूची उभारणी करणे आणि परिषदेला कायम उत्पन्नाचीही काही सोय करणे क्रमप्राप्त ठरले आहे. त्यासाठी एक वास्तुसमितीचीही योजना करण्यात आली आहे. विद्यमान मुख्यमंत्री ना. शरद पवार यांना वाङमयाबद्दल प्रेम आहे. त्यांचे मराठी साहित्याचे वाचन अद्ययावत आहे. अजूनही पुस्तकांच्या दुकानात स्वत: जाऊन नवी पुस्तके चाळण्यासाठी ते वेळ काढतात. म. सा. परिषदेच्या भावी योजनांच्या पूर्ततेसाठी हे घरचेच कार्य आहे असे मानून, ते सर्वतोपरी साहाय्य करतील, असा विश्वास वाटतो.

**साहित्यिक साहाय्य निधी**

महाराष्ट्र साहित्य परिषदेने वृद्ध, निराधार, अपंग साहित्यिकांना आर्थिक मदत देता यावी या दृष्टीने निधी जमविण्याचा संकल्प सोडला. एक लाखावर निधी जमा झाला आहे. हा निधी अजून खूप जमविण्याची गरज आहे. या निधीत जमा होणारी रक्कम ही ठेवीत गुंतवून त्यातून मिळणारे व्याज गरजू साहित्यिकांना देण्यात येईल. ज्येष्ठ साहित्यिक डॉ. वा. भा. पाठक यांना या निधीतून प्रथमच पाच हजार रुपये कृतज्ञतापूर्वक देण्यात आले. नगरचे एक तरुण लेखक अशोक थोरे यांच्या वैद्यकीय उपचारासाठीही एक हजार रुपये देण्यात आले. निधीत भर पडेल तसतशी या मदतीच्या रकमेतही वाढ होत जाईल. परिषदेच्या सदस्यांनी तसेच ग्रंथप्रेमी रसिकांनी या निधीला भरघोस हातभार लावावा अशी विनंती आहे.

**पारितोषिके : नावीन्य हवे**

परिषदेकडे सध्या सुमारे तीस वाङ्मयीन पारितोषिकांच्या वितरणाची आणि वीस स्मृतिदिनांच्या आयोजनाची जबाबदारी आहे. रा. श्री. जोग स्मारकनिधीही नुकताच परिषदेकडे सोपवण्यात आला आहे. सुप्रसिद्ध लेखक व प्रकाशक ग. ल. ठोकळ यांच्या स्मृतीदाखल त्यांचे चिरंजीव कृष्णकुमार ठोकळ यांनी उत्कृष्ट ग्रामीण साहित्याला पारितोषिक देण्यासाठी परिषदेला देणगी दिली आहे. हा जो लोभ व विश्वास परिषदेबद्दल सर्वांना वाटतो, तेच आपले खरे वैभव आहे. पारितोषिकांच्या संख्येत आणखी वाढ होण्याची शक्यता आहे. नव्या तरुण लेखकांना आपले अनुभवविश्व समृद्ध करण्यासाठी आणि आपली वाङ्मयीन जाण विकसित करण्यासाठी उपकारक ठरेल अशी नवी पारितोषिके वा अभ्यासवृत्त्या ठेवण्याची गरज आहे. मराठी साहित्यावर प्रेम करणाऱ्या रसिकांच्या दातृत्वाला हे एक आव्हान आहे. उत्तम साहित्यकृतींचा गौरव, तरुण गुणी साहित्यिकांना

प्रोत्साहन देऊन विकासाच्या संधी उपलब्ध करणे, अशा निरनिराळ्या स्तरांवर पारितोषिके असली तरच त्यांचा खरा लाभ घडू शकेल.

**ग्रंथव्यवहार : उत्साहदायक चिन्हे**

मराठीतील एकूणच वाङ्मयीन व्यवहार हा गेल्या दोन-तीन वर्षांत द्रुतगतीने वाढत आहे. १९६०–६५ च्या दरम्यान नव्या लेखनाची आणि दर्जेदार निर्मितीची लाट आली होती; आणि आजच्या अनेक मान्यवर लेखकांच्या पहिल्यावहिल्या आश्वासक कृती त्या कालावधीत प्रसिद्ध झाल्या होत्या. १९८७–८८ हे वर्षही असेच नव्या प्रतिभेचे सुखद दर्शन घडवणारे आहे. अनेक धाडसी व चोखंदळ प्रकाशक, नवनवे लेखक नावीन्यपूर्ण पुस्तके आणि उत्कृष्ट निर्मितिमूल्ये यांबाबत प्रयोगशील आहेत; अनेक कल्पनारम्य योजनांची आखणी चालू आहे. प्रकाशन समारंभाच्या आयोजनातही प्रकाशक आपल्या कल्पकतेची चुणूक दाखवत आहेत; आणि महाराष्ट्रातील बहुसंख्य वृत्तपत्रेही ग्रंथव्यवहाराच्या विविध उपक्रमांची आस्थेवाईकपणाने दखल घेत आहेत. महाराष्ट्र टाइम्स, लोकसत्ता, रविवार सकाळ, साप्ताहिक सकाळ, मराठवाडा, लोकमत, तरुण भारत (पुणे, नागपूर), तरुण भारत (बेळगाव), गोमंतक, केसरी, नवशक्ती, लोकप्रभा वगैरे वृत्तपत्रे, साप्ताहिके ग्रंथ-परिचयाला सध्या अगदी उदारपणे जागा देत आहेत; आणि विशेष म्हणजे नव्या पुस्तकांवर प्रसिद्धीनंतर अल्पावधीतच अभिप्राय यावेत याबद्दल दक्षता घेत आहेत. अनेक नवी नावे अभिप्रायलेखक म्हणून त्यामुळे पुढे येत आहेत याचीही नोंद घ्यावीशी वाटते.

'युगवाणी'ने डॉ. आशा सावदेकर यांच्या संपादकत्वाखाली नव्याजुन्या वाङ्मयाचे धारदार पुनर्मूल्यमापन करण्यावर भर दिला आहे. 'पंचधारा' मराठी आणि तेलगु यांच्यातला दुवा सांधण्याचे नावीन्यपूर्ण प्रयोग करीत आहे. ग्रंथालीने आपल्या रुची या मासिकाचा आमूलाग्र कायापालट करून, वाङ्मयीन व कला-विषयक नव्या स्पंदनांचे चैतन्य दाखवण्यासाठी जागरूकपणे आपली संपादनप्रतिभा पणाला लावली आहे. डॉ. अशोक केळकर मराठी 'भाषा आणि जीवन' त्रैमासिका-द्वारे एकूणच भाषाव्यवहारावर जो प्रकाशझोत टाकत आहेत; तो उद्बोधक आणि मार्मिक आहे. 'नवभारत' मध्येही नवनव्या विचारांचा शोध घेण्याचा डॉ. मे. पुं. रेगे यांचा प्रयत्न सातत्याने जाणवतो. अनुष्टुभ, कवितारती, अस्मितादर्श यांचेही काम मोठे आहे. 'आलोचने' नेही बहुत चिकाटीने आपली पाव शतकाची वाटचाल पूर्ण केली. या सर्वांच्या परिश्रमाचे मोल निश्चितच आहे. परंतु नवे संशोधन करणाऱ्या, मूलगामी चिकित्सा करणाऱ्या अभ्यासकांना आपले निष्कर्ष प्रकट करता येतील अशा गंभीर नियतकालिकांची उणीव प्रकर्षाने जाणवत आहे.

रविवार पुरवण्यांतून येणारे ग्रंथपरिचय हे सखोल वाङ्मयीन समीक्षेची जागा घेऊ शकत नाहीत. त्यासाठी ॲकॅडमिक, अभ्यासपूर्ण लेखन प्रसिद्ध करणारी नियत-कालिकेच हवीत. युरोप-अमेरिकेत हे काम विद्यापीठे करतात. आपल्याकडील विद्या-पीठांनी या कामाकडे द्यावे तितके लक्ष दिलेले नाही. मराठी वाङ्मयाचा अभ्यास उथळ व वरवरचा होऊन समाधान कसे बाळगता येईल ? यापुढे वाङ्मयीन नियत-कालिकांचे प्रकाशन हे विद्यापीठे व संशोधन संस्था यांचे एक महत्त्वाचे अंग बनले तरच ही कोंडी फुटू शकेल.

**काँटिनेंटल– वय वर्षे ५०**

काँटिनेंटल प्रकाशनला यंदा ५० वर्षे पूर्ण झाली. दि. १ जून १९८८ रोजी त्यानिमित्त पुण्यात स्वागतसमारंभ वगैरे कार्यक्रम ठेवण्यात आले होते. ५० वर्षांत सुमारे साडेतीनशे लेखकांची हजारावर पुस्तके काँटिनेंटलने प्रकाशित केली. अनंतराव कुलकर्णी यांनी आरंभापासून काही व्यावसायिक संकेत निष्ठापूर्वक पाळले; पुस्तकांच्या किमती रास्त ठेवल्या, कमिशनबाबत काही पथ्ये पाळली, निर्मितिखर्चावर नियंत्रण ठेवले, चोख व्यवहारावर भर दिला. लेखकांशी स्नेहभाव ठेवला. ग्रंथविक्रेत्यांना प्रोत्साहन दिले. अनंतरावांचा हा लोकसंग्रह किती प्रचंड आहे याची साक्ष स्वागतसमारंभाला दूरदूरहून आलेल्या लेखक-कवी-पत्रकारांच्या रूपाने मिळाली. अनंतरावांनी आपले दोन मातबर लेखक चिं. वि. जोशी आणि कुसुमाग्रज यांच्या नावाने विनोदी लेखन व काव्य यासाठी पारितोषिके ठेवली, हेही त्यांच्या कृतज्ञताबुद्धीचे द्योतकच आहे. अनंतरावांचा हा वारसा अनिरुद्ध आणि रत्नाकर हे त्यांचे सुपुत्रही समर्थपणे चालवत आहेत. अनंतरावांना आमच्या शुभेच्छा आणि काँटिनेंटलचे शुभचिंतन.

केशव भिकाजी ढवळे प्रकाशनसंस्थेच्या वतीने रघुवीर ढवळे यांनी गेले दीड वर्ष महाराष्ट्रात ढवळे ग्रंथयात्रा काढून सुमारे ४५ ठिकाणी ग्रंथप्रदर्शने भरवली. शंभरावर प्रकाशकांचे दहा हजारांवर ग्रंथ या यात्रेत वाचकांना बघायला मिळतात. असे उपक्रम स्वागतार्ह आहेत.

**वाङ्मयशोभा**

वाङ्मय शोभा या मासिकाने यंदा ५० व्या वर्षात पदार्पण केले. संपादक मनोहर महादेव केळकर यांच्या एकछत्री संपादनाखाली हे मासिक आजवर अव्या-हत वाटचाल करीत आले आहे; आणि केळकरांनी पंचाहत्तरी ओलांडून ७६ व्या वर्षात प्रवेश केला आहे. १ जानेवारी १९३७ रोजी त्यांनी मनोहर ग्रंथमाला हे प्रकाशन सुरू केले. त्यालाही ५० वर्षे पूर्ण झाली. मे १९३९ मध्ये पु. रा. भिडे

यांच्या सहकार्याने वाङ्मयशोभेचा पहिला अंक निघाला. दुसऱ्या अंकानंतर भिडयांनी त्यातील अंग काढून घेतले. जुलै १९३९ पासून म. म. केळकरांनी हे मासिक चालवले. आणि अनेक अडीअडचणीतूनही ते आजवर चालू ठेवले. वयोमानाने तब्येतीबद्दल केळकरांची कुरकूर चालते; परंतु वाङ्मयशोभेच्या संपादनाबाबतचा त्यांचा काटेकोरपणा अजून पूर्वीसारखाच कडक आहे. केळकरांना आणि वाङ्मयशोभेला आमच्या शुभेच्छा.

**ललित : रौप्यमहोत्सवी वर्ष**

'ललित' या ग्रंथव्यवहाराला वाहिलेल्या मासिकाने यंदा २५ व्या वर्षात पदार्पण केले. हे रौप्यमहोत्सवी वर्ष साजरे करण्यासाठी प्रत्येक अंक विशेषांक काढण्याचे ठरवून वेगवेगळ्या अतिथी संपादकांकडे त्याचे काम सोपवले आहे. आत्मचरित्र (संपादक– अशोक कोठावळे), जी. ए. कुलकर्णी विशेषांक (प्रा. हातकणंगलेकर), विनोद विशेषांक (बाळ सामंत), कादंबरी विशेषांक (जयवंत दळवी), नाट्य विशेषांक (रत्नाकर मतकरी), कथा विशेषांक (मधु मंगेश कर्णिक), ललितलेखन विशेषांक (रवींद्र पिंगे) असे अंक प्रसिद्ध झाले आहेत. नागपूर, नाशिक, रत्नागिरी वगैरे ठिकाणी त्यानिमित्त साहित्यिक गप्पांचे कार्यक्रमही आयोजित केले गेले.

**मराठी सारस्वत : उपयुक्त सूची**

'अनमोल प्रकाशन' ने 'मराठी सारस्वत' चा प्रचंड उपक्रम हाती घेतला असून त्याच्या पहिल्या खंडाचे दोन भाग प्रसिद्ध झाले आहेत. उर्वरित दुसऱ्या खंडात प ते ज्ञ पर्यंतच्या आडनावांच्या लेखकांचा समावेश असेल. संपादक श्री. अनंत जोशी यांनी अमाप कष्ट घेऊन ही अद्ययावत लेखकसूची सिद्ध केली आहे. डिसेंबर ८४ मध्ये हयात असणाऱ्या मराठी लेखकांच्या या सूचीत सुमारे ३३०० लेखकांच्या ३० हजार पुस्तकांचा समावेश झालेला आहे. डिसेंबर ८८ अखेर दुसरा खंड प्रसिद्ध करण्याच्या दृष्टीने लेखक-प्रकाशकांची दौड सुरू आहे.

'साहित्यसूची' हे मासिकही वाङ्मयीन घडामोडींची जागरूकपणे दखल घेत असते.

**'माणूस'कार माजगावकर– अत्रे पुरस्कार**

यंदाचा आचार्य अत्रे पत्रकारिता पुरस्कार 'माणूस' कार श्री. ग. माजगावकर यांना प्रदान करण्यात आला. पंचवीस वर्षे माणूस हे वैचारिक साप्ताहिक चालवून; सामाजिक परिवर्तनाच्या विविध उपक्रमांत माजगावकर सहभागी झाले. महा-

राष्ट्राच्या गेल्या २५ वर्षांतील वाङ्मयीन, सांस्कृतिक आणि सामाजिक अभिरुची संवर्धनात 'माणूस' चे स्थान निश्चितच लक्षणीय आहे. त्यामुळे त्यांची आचार्य अत्रे पुरस्कारासाठी झालेली निवड प्रशंसनीय आहे. माजगावकरांचे अभिनंदन.

डॉ. अ. ना. देशपांडे यांच्या मराठी वाङमयाच्या इतिहासाचा नववा अखेरचा खंड जूनमध्ये प्रसिद्ध झाला. एकट्याच्या हिमतीवर गेली ४० वर्षे खपून हा साक्षेपी ग्रंथप्रकल्प पूर्ण केल्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन. प्रकाशक स. कृ. पाध्ये, व्हीनस प्रकाशन पुणे यांनीही हे प्रचंड प्रकाशनकार्य नेटाने सिद्धीला नेले. मराठी वाङ्मयाचे अभ्यासक त्यांनाही धन्यवाद देतील.

वरदा बुक्सने लोकमान्य टिळक यांचे साहित्यसम्राट न. चिं. केळकर लिखित तीन खंडांतले चरित्र १ ऑगस्टला पुनःप्रकाशित केले. डेमी आकाराच्या १९४४ पृष्ठांचे हे चरित्र आहे. तसेच महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश (संपादक– दाते-कर्वे) हा १३७६ पृष्ठांचा ग्रंथही मराठी अभ्यासकांना उपलब्ध करून दिला आहे. संदर्भ-मूल्य असणारे जाडजूड ग्रंथराज प्रसिद्ध करण्यात वरदा बुक्सने खूपच साहस आणि योजकता दाखवलेली आहे यात शंका नाही.

महाराष्ट्राची सर्वांगीण माहिती देणारे 'महाराष्ट्र' हे वार्षिक. त्याची ८८ ची आवृत्ती नुकतीच प्रसिद्ध झाली.

म. सा. परिषदेच्या कार्यकारिणीच्या सदस्य प्रा. वीणा देव यांच्या मराठी कादंबऱ्यांच्या नाटचरूपांचा परामर्श घेणारा प्रबंध पुणे विद्यापीठाने मान्य करून त्यांना पीएच. डी. पदवी दिली. त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन.

सुप्रसिद्ध कुमारसाहित्यकार भा. रा. भागवत यांनी २७ मे १९८८ रोजी ऐंशीव्या वर्षांत पदार्पण केले. त्यांची शंभरावर पुस्तके प्रसिद्ध झालेली असून, फास्टर फेणे या त्यांच्या गाजलेल्या मानसपुत्रावरील हिंदी दूरदर्शन मालिकाही लोकप्रिय होत आहे.

श्रीपाद काळे आणि ज्ञानेश्वर नाडकर्णी यानी जुलैमध्ये ६१ व्या वर्षात पदार्पण केले.

रमेश मंत्री यांच्या १०१-व्या पुस्तकाचा प्रकाशन-समारंभ जूनमध्ये मुंबईत संपन्न झाला. भारताच्या निरनिराळचा नऊ राज्यांचा दौरा करून तेथील दीडशेवर साहित्यिकांच्या मुलाखती त्यांनी घेतल्या. राज्याराज्यांतील भिन्न भाषक लेखकां-मधील परस्परपरिचय आणि वाङ्मयाची देवाण-घेवाण होणे भारताच्या एकात्मतेला पोषक ठरेल.

## श्रद्धांजली

### अशोक थोरे

१२२ बालकथांची पुस्तके, १५० ग्रामीणकथा, ६० कविता, ८०० रहस्यकथा आणि ६१ कादंबऱ्या पंचवीस वर्षांच्या कालावधीत लिहिणारे लेखक अशोक थोरे यांचे वयाच्या अवघ्या ३८ व्या वर्षी १४ जून १९८८ रोजी नगर येथे दुर्धर आजाराने निधन झाले. नोकरी न करता केवळ लेखनावर त्यांनी प्रपंच चालवला; 'वाळी' ही त्यांची कादंबरी 'फकिरा'च्या वळणाची आहे, तर व्यक्ति-चित्रे माणदेशी माणसांच्या धाटणीची आहेत. पाथरवाल-नेवासा हे त्यांचे मूळ गाव. वडील माध्यमिक शिक्षक. नगरला त्यांचे वास्तव्य होते. शिवाजी महाराजांवरील राजमुद्रा ही कादंबरी त्यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाली आहे. सुंदर हस्ताक्षरात ते एकटाकी लिहीत. लेखनाव्यतिरिक्त त्यांना अन्य कसलेच प्रलोभन नव्हते. सभा-संमेलनांचेही कोड नव्हते. रहस्यकथालेखनावर भर असल्याने मराठी समीक्षकांनी त्यांजकडे दुर्लक्ष केले; परंतु त्याची खंत न बाळगता सामाजिक, ऐतिहासिक, ग्रामीण कादंबऱ्यांचेही झपाटेबंद लेखन त्यांनी, कधीतरी माझी दखल मराठी अभ्यासकांना घ्यावीच लागेल, या जिद्दीने केले. त्यांच्या शेवटच्या आजारपणात साहित्य परिषदेच्या साहित्यिक सहाय्यक निधीतून एक हजार रुपये औषधोपचारार्थ देण्यात आले होते. अशोक थोरे यांच्या स्मृतीला आमचे अभिवादन.

### भालचंद्र सुळे

ऐक्याची वाडी, बुद्रुक, मिळाली परी तरी ब्रह्मचारी, आणखी एक नारायण निकम, अंत्योदय, इत्यादी नाटकांचे लेखक श्री. भालचंद्र सुळे यांचे वयाच्या ४९ व्या वर्षी हृदयविकाराने निधन झाले. 'आणखी एक नारायण निकम' या नाट-काच्या लेखनाबद्दल राज्य नाट्यस्पर्धेत त्यांना पुरस्कार मिळाला होता. हिमालयाची सावली वगैरे नाटकातील त्यांच्या भूमिका गाजल्या होत्या. त्यांच्या निधनाने नाटक-कार, नट, दिग्दर्शक आणि कथाकार अशा बहुहुन्नरी गुणी व्यक्तीला आपण मुकलो आहोत. त्यांच्या कुटुंबियांच्या दुःखात आम्ही सहभागी आहोत.

### गजानन जागीरदार

सुप्रसिद्ध दिग्दर्शक, कलावंत आणि आत्मचरित्रकार गजानन जागीरदार यांचे वयाच्या ८२ व्या वर्षी निधन झाले. दूरदर्शनवरील 'स्वामी' ही त्यांची गाजलेली

मालिका नुकतीच संपली होती; आणि नव्या मालिकेच्या योजना आखण्यात ते दंग होते. एक बहुस्मृतीला हुन्नरी चरित्रनट म्हणून त्यांचे स्मरण दीर्घकाळ होत राहील. त्यांच्या आमचे अभिवादन.

**साहित्य पत्रिकेचे पुढील अंक**

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा दिवाळी अंक ' माझा वाङमयीन ऋणानुबंध ' या विषयावरील नामवंत नव्या-जुन्या साहित्यिकांच्या लेखांनी सिद्ध होईल.

१ फेब्रुवारी १९८९ रोजी प्रसिद्ध होणारा अंक हा १९८८ मधील महत्त्वपूर्ण ग्रंथांचे विहंगमावलोकन करणारा असेल. आपल्याला आवडलेल्या, महत्त्वपूर्ण वाट-लेल्या वा न पटलेल्या अशा पुस्तकांवर चोखंदळ वाचकसमीक्षकांच्या प्रतिक्रिया या अंकात देण्यात येतील. ' पत्रिके ' च्या वाचकांनीही आपली आवडनिवड कळवावी; जागेनुसार त्यांनाही स्थान देण्यात येईल.

मराठवाडा साहित्य विशेषांक, विदर्भ साहित्य विशेषांक, बालसाहित्य विशेषांक असे काही विशेषांक काढण्याचाही आमचा संकल्प आहे. त्यासाठी आपले सहकार्य हवे आहे.

वाङमयीन महत्त्व असलेल्या मान्यवरांची पत्रेही दर अंकात प्रसिद्ध करून, पत्रवाङमयाचे संकलन-संवर्धन करण्याची आमची योजना आहे. आपल्या संग्रही असणाऱ्या अशा पत्रांच्या झेरॉक्स प्रती पाठवल्या तर त्यांनाही पत्रिकेत प्रसिद्धी मिळू शकेल. वाङमयीन इतिहासावर आणि निर्मितिप्रक्रियेवर प्रकाश टाकणारे पत्र हे मोलाचे साधन आहे. छोटया-मोठया वाङमयसेवकांच्या पत्रव्यवहाराची जपणूक व्हावी या दिशेने काही दीर्घकालीन व्यवस्था करणे आवश्यक आहे.

परिषदेच्या सदस्यांचे व चोखंदळ रसिक वाचकांचे सहकार्य परिषद व पत्रिका यांना उपकारक ठरेल. आपल्या कल्पना, योजना, आर्थिक व अन्य प्रकारचे सक्रिय सहकार्य आम्हाला हवे आहे. परिषदेकडून आपल्या अपेक्षा अनेक असणारच; परंतु त्या अपेक्षांची पूर्तता करण्यासाठी आपला सर्वांचा हातभार लागायला हवा. परिषदेने आपल्यासाठी अमुक अमुक करावे, असे सांगताना, आम्ही परिषदेसाठी अमुक अमुक करू इच्छितो असे सांगणारे मित्रही पुढे आले तरच काही भरीव कार्य घडू शकेल.

शंकर सारडा
संपादक

# महाराष्ट्र साहित्य परिषद
## पदाधिकारी व कार्यकारी मंडळ
## (१९८८–१९९१)

---

**अध्यक्ष :** प्रा. ग. प्र. प्रधान. ५८३, गाडगीळ रस्ता, पुणे, ४११०३०
(दूरध्वनी–४४३३८७)

**उपाध्यक्ष :** डॉ. हेमंत इनामदार, ६०।१५ एरंडवणे, 'संतोष'
भारती निवास कॉलनी, पुणे, ४११००४
(दूरध्वनी–४४४७४४)

डॉ. यू. म. पठाण, २, आनंदनगर, टाऊन हॉल, औरंगाबाद, ४३१००१
(दूरध्वनी–४४३१, विस्तार–१५)

श्री. नारायण सुर्वे, बी–३४ आदर्श, वसंतबहार, सहार रोड,
जीवनविकास केंद्राजवळ, अंधेरी पूर्व, मुंबई–४०००६९

**कार्याध्यक्ष :** श्री. राजेंद्र बनहट्टी, समानधर्मा, १२८–२/२४, कोथरुड पुणे ४११०२९
(दूरध्वनी–कार्यालय–४४३०१३ निवास ४४३४७९)

**कोषाध्यक्ष :** श्री. म. श्री. दीक्षित, आयुर्वेद रुग्णालयाजवळ, ८६५ सदाशिव (नवा)
पुणे ४११०३०.

**कार्यवाह :** डॉ. गं. ना. जोगळेकर, बंगला क्र. २, फर्ग्युसन कॉलेज,
पुणे, ४११००४
(दूरध्वनी–५१४६०)

श्रीमती ज्योत्स्ना देवधर, १२०५।१–९, शिवाजीनगर पुणे, ४११००४
(दूरध्वनी–५८७०६)

श्री. चिं. शं. जोशी, ८ रमानिवास, शाळा नं. १९ समोर, विष्णुनगर,
नौपाडा, ठाणे–२.
(दूरध्वनी–५९५७४९)

अनुक्रमणिका

## विश्वस्त मंडळ



अनुक्रमणिका








## विविध समित्या

परिषदेच्या दैनंदिन आणि इतर महत्त्वाच्या कामांसाठी खालीलप्रमाणे विविध समित्या नियुक्त करण्यात आल्या आहेत :

| | |
|---|---|
| १) **सभासद मंजुरी समिती** | राजेंद्र बनहट्टी, वीणा देव, प्र. ल. गावडे, ज्योत्स्ना देवधर (निमंत्रक). |
| २) **पदाधिकारी समिती** | राजेंद्र बनहट्टी (निमंत्रक), म. श्री. दीक्षित, गं. ना. जोगळेकर, ज्योत्स्ना देवधर. (स्थानिक) |
| ३) **कार्यक्रम समिती** | ज्योत्स्ना देवधर (निमंत्रक), राजा फडणीस, वीणा देव, ललिता कुंभोजकर, प्र. ल. गावडे. |
| ४) **संशोधन समिती** | व. दि. कुलकर्णी, प्र. ल. गावडे, लीला गोविलकर (निमंत्रक). |
| ५) **वाङ्मयेतिहास समिती** | वसंत सावंत, चंद्रकुमार नलगे, लीला गोविलकर, राजेंद्र बनहट्टी (निमंत्रक) |
| ६) **ग्रंथालय समिती** | राजेंद्र बनहट्टी, म. श्री. दीक्षित, प्र. ल. गावडे, राजा फडणीस (निमंत्रक) |
| ७) **परीक्षा समिती** | गं. ना. जोगळेकर, ललिता कुंभोजकर, वीणा देव, प्र. ल. गावडे (निमंत्रक) |
| ८) **शाखाकार्य समिती** | चिंतामण जोशी, लीला गोविलकर, चंद्रकुमार नलगे, राजा फडणीस (निमंत्रक) |
| ९) **विभागीय संमेलन समिती** | चंद्रकुमार नलगे, चिंतामण जोशी, शंकर सारडा (निमंत्रक) |
| १०) **ग्रंथपारितोषिक समिती** | पुरुषोत्तम पाटील, वसंत सावंत, चंद्रकुमार नलगे, लीला गोविलकर, शंकर सारडा, ललिता कुंभोजकर, वीणा देव (निमंत्रक) |
| ११) **घटनादुरुस्ती समिती** | राजेंद्र बनहट्टी, गं. ना. जोगळेकर, राजा फडणीस, शंकर सारडा, म. श्री. दीक्षित (निमंत्रक) |
| १२) **विशेष पुरस्कार समिती** | कार्याध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी हे या समितीचे निमंत्रक राहतील. कार्यकारी मंडळाचे पुण्यातील सर्व स्थानिक सभासद या समितीचे सदस्य असतील. या समितीची कामे पुढीलप्रमाणे आहेत : |

१) परिषदेच्या वर्धापनदिनाच्या समारंभात द्यावयाच्या महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिकाचा निर्णय घेण्यासाठी परीक्षक नेमणे. २) यापुढे कै. प्रा. रा. श्री. जोग पारितोषिकाची कार्यवाही करणे.३) साहित्यिक साहाय्य निधीतून द्यावयाच्या आर्थिक साहाय्यासाठी योग्य अशा साहित्यिकाची निवड करणे.४) पुढील वर्षापासून साहित्य संस्थेतील कार्यकर्त्याला कै. डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या स्मृत्यर्थ देण्यात येणाऱ्या पुरस्कारासंबंधी निर्णय घेणे.

## परिषदेचे नवीन आजीव ससभाद

### ११ जून १९८८ ते १६ ऑगस्ट १९८८ अखेर

**पुणे विभाग–**

कु. मंगला कचेश्वर राहणे, श्री. विठ्ठल बाळकृष्ण गोरे, सौ. विनीता विजय मेंडजोगे, कु. चित्रा मधुसुदन परांजपे, डॉ. म. श्री. माटे, श्री. श्रीरंग बहिरट, सौ. स्मिता प्रकाश पाटेकर, श्री. भगवंत नरहर ढोले, श्री. पुरुषोत्तम शं. नवाथे, श्री. सुनिल अनिल मेहता, सौ. भारती मोहन परांजपे, श्री. उपेंद्र श्रीधर अभ्यंकर, सौ. नलिनी गजानन गोडसे, श्री. सदा डुम्बरे, श्री. शरदचंद्र प्रभाकर गोगटे, श्री. राजभारती साळवे, श्री. शा. मु. पानघंटी, श्री. प्रभाकर पुरुषोत्तम जोग, श्री. मु. श्री. आगाशे, श्री. म. अं. देशपांडे, सौ. प्रभा वि. वाघ, श्री. वि. त्रि. केळकर, सौ. वीणा व्यं. पानसरे, श्री. वि. रा. सपकाळ सौ. सुनीता गि. चाफेकर, सौ. वैशाली सु. गाडगीळ,

**कोल्हापूर विभाग–** श्री. अनिल घोंडीलाल मेहता, सौ. सुशिला वि. व्हटकर

**अहमदनगर विभाग–** श्री. नरेंद्र काळे, श्री. चंद्रकांत पालवे

**धुळे विभाग–** प्रा. प्रेमसुख क. छाजेड

**सोलापूर विभाग–** श्री. जयंत कुलकर्णी श्री. पद्माकर देव

**ठाणे विभाग–** श्री. रवींद्र क. फडणीस

## महाराष्ट्र साहित्य परिषद

### साहित्यिक साहाय्य निधी

वृद्ध, अपंग आणि निराधार साहित्यिकांना आर्थिक साहाय्य देण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने १९८७ साली साहित्यिक साहाय्य निधी जमा करण्याची योजना हाती घेतली होती. या निधीला सढळपणे देणग्या देऊन साहित्यप्रेमी जनतेने साहित्यिकांबद्दलची आपली कृतज्ञता व्यक्त करावी, असे आवाहन वेळोवेळी करण्यात आले होते. या आवाहनाला साहित्यप्रेमी संस्था आणि व्यक्ती यांनी, तसेच साहित्य परिषदेच्या सभासदांनी उत्तम प्रतिसाद दिल्यामुळे ३० जून १९८८ पर्यंत एक लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमा झालेला आहे. हा निधी जमविण्यास ज्या साहित्यप्रेमी रसिकांनी हातभार लावला त्यांचे आम्ही अतिशय आभारी आहोत.

जमलेल्या निधीच्या अंतरिम व्याजातून, दि. २७ मे १९८८ रोजी झालेल्या साहित्य परिषदेच्या ८२ व्या वर्धापनदिन समारंभात, वयोवृद्ध साहित्यिक डॉ. वा. भा. पाठक यांना रु. ५०००।– आणि अहमदनगरचे तरुण कथालेखक श्री. अशोक थोरे यांना वैद्यकीय मदतीसाठी रु. १०००।– असे मानधन देण्यात येऊन, या निधीच्या प्रत्यक्ष कार्यवाहीस आरंभ करण्यात आला आहे, हे जाहीर करताना आनंद होतो.

दर वर्षी अधिकाधिक साहित्यिकांना जास्तीत जास्त मानधन देता यावे यासाठी किमान पाच लाख रुपयांचा साहित्यिक साहाय्य निधी जमविण्याचा साहित्य परिषदेचा संकल्प आहे. हा संकल्प शक्य तितक्या लवकर पूर्ण करण्यासाठी सर्व साहित्यप्रेमी रसिकांनी जास्तीत जास्त रकमेची देणगी रोख, चेकने किंवा ड्राफ्टने 'महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे' या नावाने पाठवावी, अशी आग्रहाची विनंती आहे. या निधीसाठी दिलेल्या देणगीला आयकरातून सूट मिळणार असून देणगीची रीतसर पावती लगेच पाठविण्यात येईल. देणगीदारांची नावे महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या अंकातून प्रसिद्ध करण्यात येतील.

| | | |
|---|---|---|
| **म. श्री. दीक्षित**<br>कोषाध्यक्ष | **राजेंद्र बनहट्टी**<br>कार्याध्यक्ष | **ग. प्र. प्रधान**<br>अध्यक्ष |
| **गं. ना. जोगळेकर**<br>कार्यवाह | **ज्योत्स्ना देवधर**<br>कार्यवाह | **चिं. शं. जोशी**<br>कार्यवाह |

# घटना दुरुस्ती : सूचना

म. सा. परिषदेच्या सांप्रतच्या घटनेत दुरुस्त्या सुचविण्यासाठी कार्यकारी मंडळाने घटनादुरुस्ती समिती नियुक्त केली आहे. ज्या सभासदांना दुरुस्ती वा दुरुस्त्या सुचवावयाच्या असतील त्यांनी त्या लेखी स्वरूपात गुरुवार दि. २२ सप्टेंबर १९८८ पर्यंत 'निमंत्रक, घटनादुरुस्ती समिती, म. सा. परिषद, टिळक रस्ता, पुणे ४११०३०' या पत्त्यावर पाठवाव्यात ही विनंती. (स्थानिक सभासदांना घटनाप्रत कार्यालयात पाहावयास मिळेल. परस्थ सभासदांनी मागणी केल्यास त्यांना प्रत पाठवली जाईल.)

**म. श्री. दीक्षित**
निमंत्रक

---

# देणग्या

**१) कै. भीमराव कुलकर्णी स्मारक निधी**

| (दिनांक २१-७-८८ पर्यंत जमा) | रक्कम रुपये |
|---|---|
| प्रा. विद्याधर पुंडलीक, पुणे | ५१ |
| प्रा. सुषमा जोगळेकर, पुणे | ५० |
| श्री. राजाभाऊ फडणीस, पुणे | २५ |
| फादर डॉ. एलायस रॉड्रिग्ज, वसई | २५१ |
| | ३७७ |
| मागील जमा + | ११२४४ |
| एकूण रुपये | ११,६२१ |

**२) साहित्यिक साहाय्य निधी :**

| | रुपये |
|---|---|
| प्रा. ग. न. साठे, पुणे | १०१ |
| श्री. राजाभाऊ फडणीस, पुणे | १०१ |
| | २०२ |
| मागील जमा | १,०१,९९० |
| एकूण जमा | १,०२,१९२ |

**३) कै. पोतदार स्मारक निधी :**

श्री. मु. शं. देशपांडे, पुणे — रुपये २५

# जीएंची पत्रे

---

जी. ए. कुलकर्णी हे १९६०–८५ या पंचवीस वर्षांतील सर्वांत महत्त्वाचे कथाकार. महाकाव्याचा आवाका त्यांच्या कथेत होता; मानवी जीवन आणि अटळ नियती यांच्यातील संघर्षाचे आदिम बंध वेगवेगळया पातळयांवरून रंगविताना अर्थगर्भ प्रतिमासृष्टीचे संमोहक सामर्थ्य त्यांनी मोठया ताकदीने वापरले. मानवी अस्तित्वाच्या मूलभूत प्रश्नांच्या गाभ्याला हात घालणाऱ्या या कथांना तत्त्वज्ञानात्मक चिंतनाचे अधिष्ठान आहे. मला जे काही म्हणायचे आहे ते माझ्या लेखनात आले आहे; माझ्या वैयक्तिक जीवनाची माहिती त्या लेखनाच्या आकलनाला आवश्यक नाही असा त्यांचा ठाम आग्रह असल्याने जी. ए. सभासंमेलनात दिसत नसत. त्यांचे जवळचे मित्रही मोजकेच असतील. त्यामुळे त्यांच्याबद्दलचे कुतुहलही अमाप होते. वैयक्तिक भेटीगाठी टाळण्याकडे जीएंचा कल असला तरी त्यांचा पत्रव्यवहार मात्र दांडगा होता. या पत्रांचे संकलन श्री पु. ल. देशपांडे यांच्या पुढाकाराखाली होत आहे. त्याबद्दलचे निवेदन या अंकात आम्ही दिले आहे.

जी. एं. नी लिहिलेली काही पत्रे या अंकात आम्ही प्रसिद्ध करीत आहोत. शंकर सारडा, श्रीरंग विष्णू जोशी आणि पद्माकर गोवईकर यांजकडून ती मिळालेली आहेत. पत्राच्या मजकुरावरून त्यांचा संदर्भ लक्षात येण्यासारखा आहे. त्यामुळे प्रत्येक पत्राला वेगळया टीपा दिलेल्या नाहीत.

श्रीरंग विष्णू जोशी हे सांगलीला आयुर्विमा महामंडळात अधिकारी आहेत. ब्रह्माचा खांब आणि आईच्या कविता हे त्यांचे काव्यसंग्रह

अनुक्रमणिका

प्रसिद्ध झालेले आहेत. जीएंची दोन पत्रे या दोन संग्रहांच्या संदर्भात आहेत.

पद्माकर गोवईकर हे कथालेखक, नाटककार, अभिनेते म्हणून प्रसिद्ध आहेत. जीएंच्या कथांचे कथाकथन करण्याचा उपक्रम त्यांच्या मनात अनेक वर्षे घोळत होता. त्यावद्दल जीएंशी त्यांनी संवाद साधण्याचा प्रयत्न केला होता.

शंकर सारडा यांचा १९६२ पासून जीएंशी पत्रव्यवहार होता. पुढे दिलेल्या पत्रांपैकी एक त्यांच्या गुलमोहोर या पुस्तकावरील प्रतिक्रियास्वरूप आहे; दुसरे पत्र 'मनोहर' चे कार्यकारी संपादक म्हणून अल्पकाळ सारडा यांनी काम केले; त्या वेळी जीएंकडून आलेले आहे.

प्राचार्य हातकणंगलेकर यांना आलेले एक इंग्रजी पत्रही दिलेले आहे.

प्रसंगोपात निरनिराळ्या मित्रांना व लेखक-कवींना जीएंनी लिहिलेल्या पत्रांतून त्यांची वाङ्मयीन भूमिका थोडीफार स्पष्ट होते; त्यांच्या अभिरुचीवर प्रकाश पडतो.

पु. ल. देशपांडे प्रभृतींच्या पुढाकाराने हा सर्व पत्रव्यवहार संकलित होऊन पुस्तकरूपात उपलब्ध झाला तर अभ्यासकांची फार मोठी सोय होणार आहे.

या निमित्ताने महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या एका नव्या उपक्रमाकडे आम्ही वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो. जुन्यानव्या मान्यवर साहित्यिकांचा पत्रव्यवहार हा आपल्या एकूणच साहित्याच्या अभ्यास–आकलनाला उपयुक्त असतो. असा पत्रव्यवहार सांभाळून ठेवण्याची, तो प्रसिद्ध करण्याची निकड आहे. म. सा. पत्रिकेच्या प्रत्येक अंकात अशी काही पत्रे प्रसिद्ध करण्याची आमची इच्छा आहे. आपल्या संग्रही अशी कोणाही साहित्यिकाची पत्रे असतील तर त्याच्या झेरॉक्स प्रती पत्रिकेकडे पाठवाव्यात. जरूर तेथे पत्राचा संदर्भही द्यावा. ही पत्रे आपल्याला त्या त्या लेखककवीच्या अंतरंगाचे नितळ दर्शन घडवतील. सर्वांचे या उपक्रमासाठी आम्हांला सहकार्य हवे आहे.

# श्रीरंग विष्णू जोशी यांना आलेली जीएंची पत्रे

G. A. Kulkarni
Dharwar- 7
16-6-83

स. न. वि. वि.

तुम्ही आपला काव्यसंग्रह अगत्याने मला पाठवला, त्या गोष्टीला आता बरेच दिवस होऊन गेले खरे. तुम्ही तो अभिप्रायासाठी मला दिला, पण मी तो शब्द मुद्दामच बाजूला ठेवत आहे. याचे एक महत्त्वाचे कारण म्हणजे समीक्षक म्हणून माझ्याइतका नालायक मनुष्य तुम्हाला मुद्दाम शोधूनही मिळाला नसता. समीक्षक हा अत्यंत समतोल दृष्टीचा असावा लागतो. माझे पूर्वग्रह तर अगदी जालीम आणि अगदी असाध्य स्वरूपाचे आहेत. नव्हे, मी पूर्वग्रहांचेच एक गाठोडे आहे, असे देखील म्हणता येईल. शिवाय त्यात भर म्हणजे मी स्वत: किरकोळ देखील कवी नाही. आयुष्यात मी कधीच कविता लिहिली नाही, असे नव्हे. एका विशिष्ट वयात इतर टिवल्याबावल्या करताना प्रत्येकजण कविता करतोच; पण काव्य म्हणजे काय, याची थोडी कल्पना येताच मात्र तसला उपद्व्याप हातून घडलेला नाही. आजतर माझ्या मानेवर दगड ठेवला तरी दोन सयमक ओळी माझ्याकडून लिहिल्या जाणार नाहीत. तेव्हा या पत्राला समीक्षा, अभिप्राय, असले काही न समजता ते केवळ एक वैयक्तिक प्रतिक्रियेचे रूप आहे एवढेच समजावे.

आणखी एक गोष्ट आपण ध्यानात ठेवावी, असा माझा आग्रह आहे. सौजन्याने तुम्ही इतरांची मते ऐकून घ्यावीत, पण माझे तर जाऊ द्याच, फार मोठ्या टीकाकारांची मते देखील निर्विकारपणे बाजूला सारण्याची तुमची तयारी असावी. जर लेखनाबावत तुमचा दृष्टिकोण मी समजतो तितका serious व शुचिर्भूत असेल, तर त्यातील तुमचा प्रवास सर्वस्वी तुमचाच आहे. तो अत्यंत एकाकी असतो. अनेकदा आपल्या उणेपणाची भयाण जाणीव होते. खाचखळगे तुडवावे लागतात. त्यात स्वत:च्या निष्ठेखेरीज मार्गदर्शन नसते. इतरांचे शब्द पटले तर जरूर स्वीकारा, पण ते तुमच्या रक्तातूनच प्रकट व्हायला हवेत. " If you understand this Bible, throw it away. If you do not understand the Bible, throw it away-for I respect your free-

dom !" मला वाटते, असे वाटण्याइतका कणखरपणा जरूर हवा. तुम्हाला लौकिक, आर्थिक यश मिळाले तर अर्थातच तुमच्याइतकाच मलाही आनंद होईल. पण खरे यश जोखायचे ते तुम्ही स्वतः चोखपणा, स्वातंत्र्य यांच्याच आधारे. यासाठी स्वतःजवळ थोडी नम्रता ज्याप्रमाणे हवी, त्याचप्रमाणे थोडा अभिमान-देखील हवा. सारा घोळका ज्या दिशेने पाहत आहे, त्याच दिशेने सतत न पाहण्याचा हटवाद म्हणा, उफराटेपणा म्हणा, हवा.

खरे सांगायचे म्हणजे तुमचे पुस्तक हाती येण्याआधी मी तुमची एकही कविता वाचली नव्हती. (ते कसे घडले सांगता येणार नाही, कारण एखादे प्रकाशन हाती आले की मी त्यातील कविता विभाग प्रथम पाहतो.) परंतु आता मला वाटते, ती गोष्ट चांगलीच झाली. पुस्तकामुळे तुमच्या कवितांतील विविधता चटकन ध्यानात येते. त्यात यौवनगंधित स्मृती आहेत. एके ठिकाणी लावणी वाङमयातील धुंद व सरळ सरळ वासनेचा रसिक आवेग आहे, आईच्या हळव्या आठवणी आहेत, धार्मिकतेची (आध्यात्मिक शब्द वापरत नाही) पुसटशी छटा आहे. लावणीमध्ये विषयाला शोभणारी शब्दकळा आहे, आणि तशाच ठिकाणी शोभणारीच नव्हे, तर जरूर असणारी मुक्त शरीरधुंदी आहे. मला वाटते, रब-कवीला कवितेत येथे प्रथमच स्थान मिळत आहे. (पण तुम्ही काही म्हणा, तुमच्या रबकवीच्या लुगडयाला आमच्या इरकलचे खानदान नाही !) 'पदर ढळावा आणि दिसावा क्षण चंद्राचा तुकडा,' हा किंचित रंगेलपणादेखील चुना पानाला रंगवतो, त्याप्रमाणे रंग आणतो. परंतु 'पदराआडून कसा झळकतो कळस तुझ्या बुगडयांचा,' या ओळीने मात्र प्रतिबिंब तडकल्यासारखे होते. हा कदाचित माझा दोष असेल. बुगडया हा कानांतील दागिना आहे, तो पदराआडून कसा झळकतो ? त्यातून सूचित अर्थ निराळा असला तर लावणीवाङमयात मुरून गेलेला बुगडया हाच शब्द वापरण्याचे प्रयोजन काय ? कदाचित, पदराआडून कसा झळकतो उभार तुझ्या नवतीचा...असा आशय हवा होता का ? काही का असेना, शब्दकळा आणि धुंद तरुण डोळयांचे रसिक निरीक्षण या दोन्ही दृष्टींनी ही तुमची चांगल्यापैकी एक कविता. पुष्पवतीमध्ये सूचक शृंगार आहे. कदाचित शेवटची ओळ नसती तर परिणाम एकसंधी राहिला असता. (आमच्या कॉलेजमध्ये एकदा एक तरुण मुलगी-आमचीच जुनी विद्यार्थिनी– मराठीचा तास घेत होती. जादा उत्साहाने तिने अभ्यास-क्रमात नसलेली बोरकरांची सरीवर सरी ही कविता घेतली. तिच्यात 'वेली झाल्या ऋतुमति ग ' अशी एक ओळ आहे. एका टमरेल चेहऱ्याच्या पोराने, 'वेली ऋतुमति कशा होतात ' असे विचारताच त्या विचारीला ब्रह्मांड आठवले. त्याने वात्रटपणे तो प्रश्न विचारला असता तरी क्षम्य ठरले असते. पण ते पोर अत्यंत मद्द म्हणून प्रसिद्ध होते. त्याच्यामुळे तिने त्या क्लासवरील तासच बदलून घेतले होते !)

अनुक्रमणिका

चंद्रकळा, मोहाच्या जाळचात, चंद्रकोर यादेखील यशस्वीच म्हणता येतील. काही क्षण, काही आठवणी स्वभावतःच इतक्या तरल, volatile असतात की त्यांना शब्दांत मखरबंद करणे हे एक आव्हान ठरते. त्यासाठी नेमके शब्द हजर असावे लागतात. (आणि कविता भावनांनी लिहिली जात नाही, तर ती लिहिली जाते शब्दांनी, ही गोष्ट अनेकदा विसरली जाते.) आणि ते शब्ददेखील तरलता न विघडवणारे असावे लागतात. ते शब्द रेशमी वस्त्राप्रमाणे हवेत, चिलखताप्रमाणे नव्हे. त्या दृष्टीने तुम्हाला शब्दकळा मिळाली आहे. जवळ योग्य शब्द असणे ही गोष्ट आपण समजतो तितकी सर्रास नाही. उदाहरणार्थ, तुम्ही वापरलेले सारे शब्द मला माहीत आहेत, पण मी त्यांतील एकही कविता लिहू शकलो नसतो. काही वेळा केवळ नादासाठी शब्द वापरण्याचा मोहदेखील होतो. पण शब्दप्रेम या गुणाचा तो दोष आहे. मग काही शब्द मुद्दाम ऱ्हस्व करावे लागतात, ('डोळाभेट'मध्ये मासळि, काहितरी, जळि.) काव्यात हे घडते. कविता ऐकताना हे फारसे जाणवत नाही. पण ती समोर पाहताना मात्र शब्दांचे अंगविक्षेप जाणवतात. मला एकदा वाटले, काही कविता नसत्या तरी चालले असते. (कॉलेजक्वीन, थांब). निर्दय ही कविता सुद्धा statements ची वाटते. शृंगारिकामधील फक्त शेवटची मात्र मला रेखीव वाटली. खग्रास मधील कल्पना चांगली आहे, पण ती कल्पनाच आहे. परवाच्या खग्रास सूर्यग्रहणाचा अनुभव पहा. ते धारवाडला इतके स्वच्छ दिसणार होते की मुंबईपासून माणसे येथे आली होती. ते दृश्य विलक्षण सुंदर होते यात शंका नाही, कारण त्या वेळी अक्षरशः झगझगीत प्रकाशरेषेची अंगठी दिसते.

आधी एक तासभर सारे गाव अगदी नीरव झाले होते. इतकी हजारो माणसे खिडक्यांआड असता गाव इतके शांत होऊ शकते, हाच मुळी एक किंचित भयदायक अनुभव होता. पण ग्रहणाच्या वेळी संपूर्ण अंधार होत नाही, तर संधिप्रकाश पडतो. पाखरे परतलेली आम्हाला दिसली नाहीत, आणि आमच्या दारासमोर असलेले रातराणीचे झुडुप तर फुललेच नाही. पण असे सूर्यग्रहण आयुष्यात एकदाच येते हे मात्र खरे! 'सकाळ' ही एक तुमची यशस्वी कविता. तिच्या मोठेपणीच प्रथम दिसलेली आईदेखील एकेकाळी लहान मुलगी होती ही कल्पना फार हृद्य आहे. तसा अनुभव नवा नाही व आविष्कारातही नावीन्य नाही, पण मूळ अनुभवच इतका हळवा-तरल आहे की गद्यातदेखील ओलसर झुळकीप्रमाणे जाणवून जाईल. आठवणी व त्यांच्याविषयी वाटणारी माहेरओढ (nostalgia) हा तुमच्या कवितांचा एक विशेष आहे. अनेकदा भावनांच्या वर्णनापेक्षा त्या भावना चित्ररूप होतील, अशा तऱ्हेची वस्तू किंवा दृश्य हे कवीला हवे असते, कारण ते जास्त परिणामकारक होते. Eliot त्याला objective correlative म्हणतो. त्यामुळे 'तुझ्या पदराआडचा थोडा फाटलेला अंधार' या चित्रात सारी कविता केंद्रीभूत होते.

(दुःखाने रडत असलेल्या पाठमोऱ्या आईचे हलणारे खांदे व त्यावरील केसातील हलणारे वाळलेले पान की फूल असे एक चित्र ग्रेसच्या एका कवितेत आहे.) या व तुमच्या इतर कविता वाचताना मला एक गोष्ट जाणवली– त्या वाचत असता त्या हृद्य वाटतात. त्यांत हळुवार भावनांना सांभाळणारी शब्दकळा आहे. पण त्या वाचून झाल्यावर त्याचा स्पर्श म्हणा, डाग म्हणा, ओरखडा, दाह म्हणा नंतर मनात टिकत नाही. याचे काय कारण असावे याचा मी विचार केला, तेव्हा मला एक कारण आठवले. (त्याबाबतीत खुद्द माझ्यातच हिणकसपणा आहे, हे तर पहिलेच कारण असू शकेल.)– मला वाटले, हा सारा वाण परिचित आहे, हे सारे कुठे ना कुठे आपण पाहिले आहे. आधी अनेक मुले पाहिली असली तरी प्रत्येक मुलाचा जन्म हा नवाच असतो. हे खरे असले तरी काव्याच्या बाबतीत ते क्वचितच खरे ठरते. फोटो घेताना Angle ला देखील महत्त्व असते व हा Angle तुमच्या कवितांत फार परिचित आहे. आईविषयी बोलताना माझ्या भावना भावुकतेपलीकडे जातात. आम्हीही कष्टात दिवस काढले, पण त्या मर्यादेतदेखील माझे लाड झाले. आई-वहिणीविषयी बोलताना आतड्याला पडणाऱ्या गाठी मान्य करण्यात मला कसलीही लाज वाटत नाही. तेव्हा तुमच्या त्या बाबतीतील हळुवारपणाची मला किंचितही थट्टा करायची नाही. पण त्या ठिकाणीदेखील मला Angle परिचित, सराईत वाटला. फार मागे मी एका कवयित्रीची To My Father ही कविता वाचली होती. तिचे नावदेखील मला आज आठवत नाही, इतकी ती नवखी होती. ती कविता मी कोठेतरी लिहून ठेवली आहे. मी ती शोधण्याचा प्रयत्न केला, पण आता वागण्यात बराचसा अव्यवस्थितपणा आला आहे. व ती मिळाली नाही म्हणून मी तिचा आशय सांगतो. (आशय म्हणजे कविता नव्हे, याची मला अत्यंत स्पष्ट जाणीव आहे.) ती मी प्रथम वाचली, तेव्हा ती अतिशय moving वाटली हे मला आजही आठवते.

माझा बाप भिंतीकडे वळून पलंगावर पडला होता. त्याची मळकी कॉलर अस्ताव्यस्त होती. पायमोज्यांवर अनेक भोके होती व काढून ठेवलेल्या आकारहीन जुन्या बुटांना कधी पॉलीश लागलेले नसावे अशी बुरसट कळा होती.

माझ्या मैत्रिणी आल्या की या साऱ्यांची मला शरम वाटे. त्या येणार म्हणताच तो कधी घरी नसावा, असे सतत वाटत असे.

पण आता माझा बाप भिंतीकडे तोंड करून रडत होता.

घरात त्याच्या वयाच्या जवळचे कुणीच नव्हते. त्या वेळी मला वाटले, नवे, वाढते, थरारक शरीर टाकावे. वर्षाच्या शिडीवरून झपझप वर जावे व सुरकुतलेल्या चेहऱ्याच्या, करड्या, विरळ केसांच्या आईप्रमाणे वयस्क होऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवावा.

अनुक्रमणिका

माझ्याविषयीचे प्रेम, माझ्याविषयीची चिंता, हेच कदाचित या दुःखी, एकाकी वेदनेचे कारण असेल. परमेश्वरा, मी न कळत त्याला मनाच्या या नागड्या क्षणी पाहिले हे मात्र त्याला कधी कळू देऊ नकोस.

तेवढे वस्त्र माझ्या बापाच्या आयुष्यावर राहू दे !

(त्या ठिकाणी बायबलमधील Noah एकदा मद्य घेऊन अस्ताव्यस्त नग्न पडला होता. तेव्हा त्याच्या मुलांनी त्याला पाहिले, असा किंचित तिरपा संदर्भ आहे.)

तुमच्या सामाजिक संदर्भाच्या कविता वाचून मात्र मी असमाधानीच नव्हे, तर त्रस्त झालो. तुमच्या संग्रहातील या सर्वांत दुबळ्या, उबवलेल्या कविता. म्हणजे तुमच्या भावना अप्रामाणिक आहेत, असे मला म्हणायचे नाही. (तो उद्धटपणा होईल. प्रामाणिकपणा निःसंशय ठरवण्याचा मार्ग आपल्याला अद्याप उपलब्ध झालेला नाही. शिवाय प्रामाणिकपणा हा वाङ्मयाचा निकष होतो का, हा विषयही फार गुंतागुंतीचा आहे.) तर त्या सांकेतिक व उथळ आहेत. काशीयात्रा झाल्यावर आपण तेथे येऊन गेलो; याची साक्ष ठेवण्यासाठी एका गणपतीला भेट द्यावी लागते व त्याला नावच साक्षी गणपती आहे, त्याप्रमाणे हळुवार आठवणींच्या कोवळ्या कविता लिहिल्यावर त्या स्वतःविषयीच आहेत, अपुऱ्या आहेत अशी रुखरुख तुम्हाला वाटत असावी व त्यामुळे जास्त मोठा सामाजिक संदर्भ देण्याचा तुमचा प्रयत्न असावा. हा मोह मोठ्या कवींनादेखील टाळता आलेला नाही. सगळे कवी तुतारी, नगारे, डफ इत्यादी वाजवत असता आपण एकाकी पडायला नको, म्हणून बालकवींनी देखील धर्मवीर नावाची वाष्कळ कविता काढली. माडखोलकरांना ती उर्जस्वल स्तोत्रासारखी वाटली. वाटली असेल, पण औदुंबर, भिंत खचली, कापूस मेघांचा या कविता पहा व ती शब्दांची उतरंड पहा.

टेरेलिनचे कपडे पाहून तुम्हाला शरम वाटते. ही भावना सत्य असेल, पण तुम्ही टेरेलिनचे कपडे घातले म्हणून ती भिकारीण झाली का, किंवा तुम्ही ते काढून टाकताच ती निराळी होईल का ? तिला पाहताच शरम वाटणार नाही असा एकच जगात कपडा आहे—तो म्हणजे नागडेपणा— त्याला तुमची तयारी आहे का ? म्हणजे माणसाने मन दगडाचे करावे, असे नव्हे, पण करुणा उबवून तिची भावुकता होऊ नये. नागपूरकडील एका निष्ठावान गांधीशिष्य आचार्यांबाबतचा एक किस्सा मला आठवतो. त्यांचा वाढदिवस होता म्हणून घरी बासुंदी केली. नातलगांची छोटी मुले बासुंदी मिळणार म्हणून जिभल्या चाटत होती. तर आचार्यांनी काय केले ? तर सारी बासुंदी उचलली व भिकाऱ्यांच्या पोरांना वाटली. कारण काय, तर भारता-मधील प्रत्येकाला बासुंदी मिळेपर्यंत मी बासुंदी घेणार नाही. मग त्या दिवशी त्यांनी नेहमीप्रमाणे भाकरी, केळी व दूध असा नेहमीचा आहार घेतला. भारतातील प्रत्ये-

काला दररोज भाकरी, केळी, दूध असा आहार मिळतो, याचा आनंद ज्याला होणार नाही, तो माणूस करंटाच म्हटला पाहिजे ! ! (Jesus चे उदाहरण ध्यानात घ्या. त्याला करुणा नव्हती असे म्हणणे मूर्खपणाचेच ठरेल, पण ती डोळस होती. एकदा तो घरी आला असता एका स्त्रीने त्याच्या पावलावर अत्यंत किमती अत्तर ओतले व आपल्या केसांनी ती पाऊले पुसली. आताप्रमाणेच त्याही काळी "हाच पैसा गरिबांसाठी खर्च करता आला नसता का?" असा चुकचुकाट करणारी माणसे होतीच. तेव्हा जीजसने उत्तर दिले, "ज्यांना गरिबांसाठी काही करायचे असेल, तर त्यांनी करावे, कारण गरीब तर सदैव आहेतच. मी स्वतः सदैव असणार नाही. तेव्हा तिला जर माझ्यासाठी काही करायचे असेल, तर करू द्या ना !" आपल्याकडे मात्र सद्गुणाचा संधिवात व्हावा, असे आखडलेले स्वरूप थोर मानण्यात येते ! 'मोर्चा वेश्यांचा' मध्ये देखील हाच बटबटीत सांकेतिकपणा दिसतो. वेश्यांची वस्ती उठवली की महिला मंडळातील सगळ्याच घरंदाज स्त्रिया वारांगना कशा ठरतात? (बेळगावात काही गल्ल्यांत भरवस्तीत वेश्यांची घरे असत. अनेकदा रात्रभर त्यांच्या भानगडीमुळे झोप येत नसे.) संमेलन बघण्यासाठी जमलेले लोक षंढ झाले? आचरट शब्दच्छल करायचा झाला तर इतके लोक षंढ झाले यावद्दलच वेश्यांनी जास्त तक्रार केली असती ! तेव्हा वेश्या सार्‍या दलित, बिचार्‍या, व इतर लोक राक्षस असा सरळसोट दृष्टिकोण नको. द्वेष, तिरस्कार व राग दाखवण्यासाठी एवढ्या मोठ्या पन्ह्याचे कापड वापरणे योग्य ठरणार नाही, पण त्याला मराठीत परंपरा आहे. गिरणी कामगार, शेतकरी, इत्यादी सद्गुणांचे पुतळे व श्रीमंत, मध्यमवर्गीय, शिकलेले, सारे खलनायक असा सरळसोट मार्ग वरेरकरांचा; मग त्यात खांडेकरी भाबडी सहानुभूती मिसळली तर पाहायलाच नको. या मळक्या, ओल्या गोणपाटाने एकाचे तोंड पुसायचे व लगेच त्याचाच तोबा करून दुसऱ्याला झोडपायचे, असा खाक्या असलेला तो काळ होता. एखाद्या वर्गात अनेक व्यक्ती असतात, पण एखाद्या व्यक्तीचे वर्णन धोपटपणे सार्‍या वर्गाला कधीच लागू पडत नाही. आणि व्यक्ती स्वतः इतक्या गुंतागुंतीच्या असतात की त्यांचे सुष्ट वा दुष्ट असे घाऊक वर्गीकरण फार प्राथमिक स्वरूपाचे ठरते. अशा तऱ्हेने रेखाटलेली चित्रे व्यंगचित्रे ठरतात, आणि माणसाला मेंढ माणूस करणे हा तर वाङ्मयातील फार मोठा गुन्हा ठरेल. तुम्हाला Auden हा कवी कितपत आवडतो याची मला कल्पना नाही. तो स्वतः अशा एका अवस्थेतून (मुख्यतः राजकीय) गेलेला कवी आहे, पण त्याचा अंतिम निष्कर्ष असा आहे : "The poet is not there to convert the world. The world around us is, as it always has been, full of gross evils and appalling misery, but it is a fatal illusion and a shocking, over-

estimation of the importance of the artist in the world to suppose that, by making works of art, we can do anything to eradicate the one or alleviate the other. The political and social history of Europe would be what it has been, if Dante, Shakespeare, Goethe, Titian, Mosart, Beethovan et al had never existed."

या तुमच्या कवितांविषयी लिहिताना मी शिष्टाचार बाजूला ठेवला, लक्ष्मण-रेषा ओलांडली, असे तुम्हाला वाटले, तर मात्र क्षमा करा. काहीतरी गुळमुळीत, औपचारिक बोलून मी वेळ मारून न्यावी अशी तुमची बहुधा अपेक्षा नसावी. तशी असली, तर त्या कामासाठी माझ्याइतका अयोग्य माणूस कुणी नसेल. मला तुमच्या इतर काही कविता आवडल्या, म्हणून हे लिहावेसे वाटले. जे वाटत नाही ते मी लिहिले असते, तर ते मला अप्रामाणिकपणाचे झाले असते, तुम्हाला अन्यायाचे झाले असते.

आणखी एका विषयाचा मी थोडक्यात उल्लेख करतो. तुमच्या कवितांतील धार्मिक संदर्भाचा. तशा कविता फारशा नाहीत, आणि तो विषय गुंतागुंतीचाच आहे. त्याबाबत लिहायला तर वाङमयीन समीक्षकांपेक्षाही मी जास्त नालायक आहे. शिवाय या ठिकाणी तुम्हाला त्याबाबत लिहायला फार संकोच वाटतो. मी तसा भाविक, श्रद्धाळू नाही. सगुणोपासना तर मला केवळ हास्यास्पद वाटते. परमेश्वरावर न्याय, करुणा, इत्यादी गुणांचा प्रथम आरोप करायचा, मग ते सारे खरोखरीच अस्तित्वात आहेत असा सोइस्कर समज करून भक्ती करायची, हा मार्ग मला लहानपणापासूनच अतिशय भावडा वाटतो. मागे एकदा मी Autobiography of a Yogi नावाचे पुस्तक वाचले होते. आयुष्यात मी तशी कंटाळवाणी पुस्तके बरीच वाचली आहेत, पण चक्क शारीर घृणा ज्यांच्यामुळे निर्माण झाली अशा थोड्या पुस्तकांपैकी हे एक आहे. ज्याच्यामुळे आपली श्रद्धा वाढली हे सांगताना लेखकाने एक उदाहरण सांगितले आहे. तो कुठल्या तरी परीक्षेला बसणार होता. त्यात इंग्रजीत पस्तीस मार्क न पडल्यामुळे नापास होणार होता. पण त्याच्या (धन्य) गुरुजींनी त्याला सांगितले की, परमेश्वरी कृपा होईल ! त्याप्रमाणे चक्क चमत्कार घडला. त्याच वर्षी नेमके पस्तीसऐवजी तेहतीस अशी किमान मर्यादा ठरली, व लेखक पास झाला ! असली भारूडे तर आपल्यावर बांडगुळाप्रमाणे जगत आली आहेत. असल्या चिंध्यांनी माणूस कोणत्याही तऱ्हेने मोठा न होता परमेश्वर मात्र क्षुद्र होतो ही गोष्ट आपणाला जाणवत नाही. त्याच्या जोडीला आपल्या कमरेचा सांधा इतका ढिला की, तो कोणासमोरही वाकतो, मानेचा मणका इतका दुबळा, की डोके कुणाच्याही पावलांवर पटकन लडबडते. काही वेळा तर

पावलेदेखील लागत नाहीत. अमक्याची पासोडी, तमक्याचा सदरा, खडावा असल्या वस्तूदेखील पुरे होतात. (परवा मी शिरोळला एका भिक्षापात्राचे देऊळ पाहिले!) त्यामुळे आपल्याकडे स्वामी, आचार्य, महाराज, बाबा यांची एकच मांदव घासणी झाली आहे आणि त्या सगळ्यांमध्ये असे अचाट दैवी सामर्थ्य, चमत्कार करण्याची शक्ती की ते सारे हयात असूनही काही गोष्टी सामान्यपणे चालू आहेत, हाच मुळी एक चमत्कार मानला पाहिजे! (मदिनेला महंमदच्या कबरीजवळ प्रथमच रोख इशारा आहे, "या ठिकाणी नम्र व्हायचे ते अल्लापुढे. नमस्कार महंमदला नाही. महंमद देव नसून त्याचा प्रेषित आहे याचा विसर पडू देऊ नका!" महंमदने एकदा एक खजुराचे झाड तोडायला लावले. कारण काय? "मी गेल्यावर खुळचट माणसे त्याचे पूजन करू लागतील, कारण मी त्याखाली बसत असे!") असे सारे असले तरी मी माझ्या मतांबाबत आक्रमक नाही. मी दर शुक्रवारी प्रभावतीला दुर्गा-देवीला नेत असे; अजूनही दर शनिवारी घरचा नारळ युनिव्हर्सिटी मारुती नावाच्या देवळाकडे जातो, व तो मलाच न्यावा लागतो. परवा औदुंबर, नरसोबा-वाडी भेट ही तिच्यासाठी, काशीला विश्वेश्वराची पूजा केली ती तिने. इचल-करंजीला माझ्याबरोबर जे मित्र आले होते, ते तर अत्यंत भाविक, भावुक, दत्त-संप्रदायी आहेत. मी माझी मते केवळ माझ्या स्वतःच्या प्रवासापुरतीच ठेवली आहेत. तरीसुद्धा हे सारे लिहायला संकोच वाटतो. एखाद्या ठिकाणी शुचिर्भूत अर्चना चाललेली असावी, तेथे एखाद्या व्रात्य माणसाने लुडबुड करावी, तसा थोडासा [प्रका]र आहे हे खरे, त्याबद्दल क्षमस्व. (व्रात्य म्हणजे उनाड नव्हे, तर वैदिक [सं]स्कार प्राप्त न झालेला.)

मी वर एके ठिकाणी धार्मिक हा शब्द वापरला आहे, कारण धार्मिक व आध्या-[त्मि]क यांच्यात मला थोडा फरक करायचा आहे. "धार्मिकतेमध्ये धर्मामुळे आलेले [स्थै]र्य म्हणा, अवजडपणा म्हणा, परंपरा म्हणा, त्याची मर्यादा असते. पारंपरिक [सं]स्कारांचे प्राबल्य असते, कारण त्यांच्यामुळेच आपली भावनिक जडणघडण झालेली [अ]सते. त्यामुळे आपणाला चाललेली भिंत, वेद म्हणणारा रेडा, किंवा अंगुली[व]धार गोवर्धन पर्वत सहज आठवतो. आभाळातून येणारा आवाज ऐकत पर्वत [च]ढणारा मोझेस आठवणार नाही, कारण आपला Consciousness तसा घडलेला [ना]ही. (एखाद्या ज्यूला गोवर्धन पर्वत दिसणार नाही.) या साऱ्यामुळे एक विशिष्ट [त]ऱ्हेची(च) श्रद्धा आपणाला जन्मापासूनच वडिलार्जित मिळकतीप्रमाणे प्राप्त [झा]लेली असते. 'आध्यात्मिक' हा स्वतंत्र, कष्टाचा, नैराश्याचा एक कठोर प्रवास [आ]हे. दर क्षणी कसले तरी मूल्य द्यावे लागते, अत्यंत प्रिय स्नेहधागे तोडावे [ला]गतात, आणि आयुष्य साराच वनवास होतो, कारण ही जी आध्यात्मिक ओढ [आ]हे, तिला तडजोड मान्य नाही. पराक्रमही करावा आणि दागिनेही घालावेत,

त्याप्रमाणे चारचौघांप्रमाणे व्यवहारी संसार करावा, व अध्यात्म साधावे हे तेथे चालत नाही. All or Nothing असे त्याचे ब्रीदवाक्य आहे. (इंग्रजीमध्ये Thomson नावाचा एक कवी आहे. तो धर्माने catholic खरा, पण त्याची प्रसिद्ध कविता धार्मिकपेक्षा आध्यात्मिक आहे. चित्रकलेत रेखाचित्रासाठी एक प्रकारची कोळसा काडी वापरण्यात येते. अगदी बारीक काटक्या अर्धवट जाळून त्यांचा आकार न मोडता कोळसा होतो. याला Limning असा एक शब्द आहे. तर कवी आर्ततेने म्हणतो, "सारे काही जाळून टाकून कोळसा होऊनच तुझे चित्र काढणे अटळ आहे का ? मी सर्वस्वी होरपळून जावे अशीच तुझी अट आहे का ?") अशा आध्यात्मिक अनुभवांत येऊन पोहोचण्यापेक्षा पोहोचण्यापर्यंतचा प्रवास महत्त्वाचा असतो. त्यामुळे उत्तम प्रेमकवितांप्रमाणेच श्रेष्ठ आध्यात्मिक कविता फार दुर्मिळ असते. भक्तिपर कविता नको इतकी आहे, धार्मिक कवितादेखील उदंड आहे, पण आध्यात्मिक कविता मला तरी आठवत नाहीत. 'वाट पाहुनि शिणले डोळे', 'जळाविण मासोळी जैशी' अशी थोडी अस्वस्थता संतकवींत आहे. पण एकंदरीने ती स्थिर श्रद्धेनेच सुरुवात होते, तिच्यावरच जगते, आणि तिला कधी तडाही जात नाही. तिला अचल अशी श्रद्धा म्हणा, संतांचा श्रेष्ठपणा म्हणा, अगर साचेबंदपणा म्हणा, ज्याला आधीच श्रद्धा प्राप्त झालेली आहे, त्यालाच त्या श्रद्धेची भुरळ पडते. ती श्रद्धा मिळवताना झालेल्या जीवघेण्या धडपडीचे क्वचितच दर्शन घडते. साऱ्या कुटुंबाची वाताहत झाल्यावर 'बरे झाले देवा...' म्हणणे हे ठीक आहे. (एका Christian saint बाबतही असेच उद्‌गार प्रसिद्ध आहेत.) पण तसे वाटत असल्यास प्रथमच त्यांचा त्याग करण्याच्या वेदना त्यात नाहीत, तसा निर्णय घेण्याचा Heartburn नाही. रवींद्रांची धार्मिक कविता यामुळे मला भावत नाही. जन्मतःच मिळालेला तीळ एखाद्या सुस्वरूप स्त्रीने मिरवावा, तशी त्यांची श्रद्धा; आणि त्यांच्या साऱ्या कविता तिच्या ओंजळी आहेत. रेशमी सुबक छत्री उघडल्यानंतर तिच्यावर पावसाचे डाग न पडता, वेडच्या वाऱ्याची दांडगाई न लागता प्रवास संपावा हेदेखील देवाघरचेच देणे आहे. इतरांनी हेवा करावा अशी देणगी आहे. तसा मला हेवा वाटतो, पण हजार पोचे पडलेल्या, तेथल्या तेथे भरकटत असलेल्या मला तसल्या प्रवासात कुठेतरी आसरा शोधावासा वाटला, तर त्या कवितांकडे जावे, असे मात्र वाटत नाही हेही खरे. आध्यात्मिक काव्याचा एकच नमुना म्हणजे भगवत् गीता. परंतु त्यातही मला समाधान झाले नाही इतका मी मेणमातीचा. महत्त्वाचे प्रश्न अनुत्तरितच राहिले, अर्जुनाचे समाधान थोड्या दमदाटीनेच झाले, असे वाटते. (किंवा गीता पूर्ण समजावून घेण्याची माझी पात्रताच नाही. अखेर, सारे प्रश्नच टाकून Thy Will will be done. अशी संपूर्ण नम्रता हीच साऱ्यांनी स्वीकारली. ही अवस्था अत्यंत परिणत ज्ञानाची तरी असेल, किंवा

संपूर्ण हताशतेची तरी असेल. पहिले स्वरूप माझ्यासारख्याच्या पूर्ण आवाक्याबाहेरचे आहे, व दुसऱ्या प्रकारची संपूर्ण अहंहीनता मला नको. तेव्हा एका कवीच्या शब्दांत सांगायचे तर आपला आधार ही सतत त्रस्त करणारी श्रद्धाच. तेव्हा "O God, help me retain this disbelief.")

धार्मिक नसताही आध्यात्मिक असणे शक्य आहे. याचे Shelley हे एक उदाहरण आहे. शिकत असतानाच त्याने 'निरीश्वरवादाची अटळता' यावर एक पत्रक लिहिले, व त्याबद्दल त्याला हाकलून लावण्यात आले. Jesus विषयी त्याला व्यक्ती म्हणून आदर असला तरी 'स्वर्गात गुलामांची भरती करणारा धर्म' असे त्याने Christianity चे वर्णन केले आहे. परंतु त्याच्या स्पर्शाने आधिभौतिक आध्यात्मिक होते. West Wind मध्ये सारे विश्व व्यापून राहणारे तत्त्व दिसू लागते. Destroyer and preserver, नाश करता निर्मिती करणारी, आभाळ, समुद्र, पृथ्वी व्यापून वसणारी सामर्थ्यशाली शक्ती ! (सतत सजीव असलेली, नाश-निर्मितीत जागृत राहणारी, जेथे पानाची गळून पडताना होणारी हलकी थरथर विसरली जात नाही, आणि जेथे स्फोटामुळे नष्ट होणारे पर्वत हे डोळ्यांत भरत नाहीत, ती माया– (माया या शब्दाचा हा खरा अर्थ आहे.) तिला आदिमाया हे नाव देऊन तिच्यापुढे नम्र होणारा माणूस डोळस प्रतिभावंतच होता. या कल्पनेत तिला करुणा, भक्तिवशता, अनाथांची रक्षिका असली विशेष चिन्हे चिकटवलेली नाहीत. गुरुत्वाकर्षण संतांच्या बाबतीत काम करते अगर करत नाही, असे म्हणण्यासारखे ते भाबडे होईल– असे मला वाटते. इतरांना तसे वाटत नाही, कालच मला पुण्याचा एक भक्त भेटला. त्याचा गुरू ध्यानासाठी बसला की तो दोन फूट अधांतरी असतो, असे त्याने छातीवर हात ठेवून– माझ्या नव्हे, स्वतःच्या– मला बजावले, तुमच्या कवितांत एकेक ओवी पिणाऱ्या वडिलांचा, फाटक्या पदराला सावर देत भक्तीने हात जोडणाऱ्या आईचा उल्लेख आहे– खरे तर पामरी ही तुमची फार सुरेख कविता आहे. त्यातील हळुवार शब्दांतील हळुवार आठवण व्याकुळ करणारी– केवळ हुरहूर लावणारी नव्हे– आहे. पण मला Trunk शब्द मात्र खटकला. कदाचित इतर कवितेप्रमाणेच एखादा किंचित जुनाट, पामरीसारखाच खानदानी वासाचा, पोताचा शब्द असता तर ? मला तसला शब्द आठवत नाही. शब्दांच्या दारी मी नेहमीच तिष्ठत असलेला भिकारी आहे. नाहीतर मीच कविता लिहिल्या असत्या, गद्यासारखे हमालकाम केले नसते–

–तर तुम्हाला ओव्या आठवतात, आणि एक ओवी मिळाली तर दावणदेखील स्वीकारायला तुमची तयारी आहे. ओवीची भुरळ मी समजू शकतो. कारण ओवी तर मराठी काव्याचा मायशब्द आहे. पण या कवितांतील तुमच्या धार्मिकतेपेक्षाही आई-वडिलांविषयीची कोवळीक मला जास्त जवळची वाटते, मोलाची वाटते.








ती मला आतड्यात जाणवते. भजन, पूजन, ध्यान, इत्यादींनी तुम्हाला मन:शांती मिळत असेलही. (मला तसला फारसा अनुभव नाही, पण ती मन:शांती म्हणजे एक प्रकारचा उच्च विसर असतो का ? त्या अवस्थेत मग टेरेलिनची शरम निर्माण करणाऱ्या भिकारणीचे, संमेलन करणाऱ्या वेश्यांचे काय होते ? म्हाताऱ्याचा पंचा सोडणाऱ्या या विशेषांमुळे मनाच्या पापण्यांवरील पडदे उघडतात का ? )पण अखेर या शांतीसाठी मन किती दडपावे लागते याचाही कधीतरी विचार करा. नाहीतर दुहेरी जीवन स्वीकारण्याची तयारी असू द्यावी.

नाही नाही म्हणता मी फार विस्ताराने लिहिले. थोडक्यात लिहायचा विचार असल्यामुळे सारे नीट सांगता आले नाहीच. शिवाय मीच अशा गोंधळात असल्यामुळे लिहितानाही गोंधळ टाळता आला नाहीच. तरी मी लिहिले. कारण मला वाटते, कवी म्हणून तुमची जी वाढ मला दिसते, ती मुख्यत्वेकरून या दिशेने. मग ती कोणत्याही मताप्रमाणे होवो. तुमच्या, माझ्या अगर Zen Budhism च्या दिशेने किंवा शांकरमताप्रमाणे.

परंतु एवढे झाले तरी माझी रुखरुख मात्र कायम आहे. आपण या विषयाबावत तुम्हाला लिहायला नको होते.

कारण तसे काही लिहायला माझ्याजवळ ती ऐपत नाही.

पत्रात (परीक्षणात नव्हे) अनेक ठिकाणी मर्यादा ओलांडली गेली आहे. त्याबद्दल मात्र क्षमा करता करता तुम्ही श्रांत व्हाल. तेव्हा क्षमस्व.

आपला

जी. ए. कुलकर्णी

ता. क. :— एक व्यवहारी विनंती. पत्र खासगी व वैयक्तिक स्वरूपाचे आहे. म्हणजे माझी खासगी मते व पत्रांतील मते वेगळी असतात, असे नव्हे. पण पत्राला चेहरा असतो, त्याच्यापुढे एक व्यक्ती असते. केवळ लेखनाला तसला कसलाच रंग नसतो. या सूचनेचे कारण म्हणजे माझ्या काही पत्रांचा अतिशय दुरुपयोग झालेला आहे. शिष्टाचाराची गोष्ट जरी सोडली, तर केवळ कोरड्या कायद्याच्या दृष्टीनेही ती गोष्ट दुष्ट आहे. The Receiver is entitled to possession, not publication. ही साधी गोष्टदेखील त्यांना पत्रांबाबत माहीत नसते.

म्हणून ही विनंती.

जी. ए.

अनुक्रमणिका

धारवाड ५८०००७
१०।५।८४

स. न. वि. वि.

आपले पोस्टकार्ड मिळाले,

प्रकृतीचा लहरीपणा अधिकच झाल्याने प्रत्यक्ष भेट होण्यास बराच काळ जावा लागेल, असे वाटते.

मला ते Quotation नक्की आठवत नाही. पण कधीतरी हस्तलिखितात मी ते पूर्ण वाक्य असे लिहिलेले पुसट आठवते : "तिने कडेवर घेतलेले मूल कधी रडले नाही, तिने लावलेले झाड कधी मेले नाही. तिच्या शब्दांत शुभं करोति होती, आणि तिच्या आवाजात ओवी होती." पण नंतर ते अर्धे वाक्य कुठे आले हे मला आठवत नाही.

कळावे.

आपला
जी. ए. कुलकर्णी

G. A. Kulkarni
Saket Housing Society
Near Sangam Press
Kothrud, Pune-411 029.
8th Jan. 1986

श्री. श्रीरंग विष्णू जोशी यांस–

स. न. वि. वि.

तुम्ही अगत्याने पाठवलेले 'आईची कविता' हे पुस्तक मिळाले. त्याबद्दल फार आभारी आहे. सध्या दृष्टिदोष निर्माण झाल्यामुळे मी येथेच आहे. खरे म्हणजे मी त्यासाठी पुण्याला आलो, पण त्याबाबत काही करता येत नाही, हे समजल्यामुळे मी ती Treatment थांबवली आहे. पण नंतर आणखी एक तक्रार सुरू झाली. त्याबाबत एक छोटे व प्राथमिक operation करावे लागले. त्या वेळी पाचसहा दिवस हॉस्पिटलमध्ये राहावे लागले. अडीच-तीन महिन्यांनंतर जास्त मोठे ऑपरेशन करावे लागणार आहे. या साऱ्यामुळे मन त्रस्त आहे. आता धारवाड संपले, व एक सुखाचा कालखंड संपला. पुणे अद्याप अंगवळणी पडले नाही, आणि पडेलसे वाटत नाही.

हल्लीच्या दिवसांत आईवरील आर्त आठवणींनी सुगंधित होऊन आर्द्र झालेल्या कविता कुणी लिहिते हीच नवलाची गोष्ट आहे. मला कधी तुमच्या कवितांवर

अनुक्रमणिका

अगदी अलिप्त समीक्षक दृष्टीने लिहिता येईल, असे वाटत नाही. कारण गाय, आई, शिवाजी हे विषय मला अति जिव्हाळ्याचे वाटतात. काही वेळा तर मी त्याबाबत भावविवशदेखील होत असेन. त्याबद्दल मला कधी कमीपणा देखील वाटला नाही. उलट, एखाद्या व्यक्तीविषयी अथवा विषयाबाबत जो माणूस कधीच भावविवश होऊ शकत नाही, त्याच्याविषयी मला, त्याला दूर ठेवण्याइतका आदर तरी वाटेल, किंवा परकेपणा तरी !

सध्या वाचताना, लिहिताना डोळ्यांना फार त्रास होतो, तेव्हा सविस्तर लिहिणे कितपत जमेल याबद्दल शंका आहे. शिवाय या पुस्तकाविषयी कोरडा उपचार दाखवून एखादे 'समाधान व्यक्त करणारे' पत्र पाठवणे अन्यायाचेच होईल. तीन महिन्यांत डोळे जरी सुधारले नाहीत तरी operation चे दडपण तरी नाहीसे झालेले असेल. त्यानंतर लिहिण्याचा प्रयत्न करीन; पण मला वाटते, ते लिहिणे तुमच्या कवितांविषयी जेवढे असेल, तेवढेच, कदाचित जास्तच, खुद्द माझ्याविषयी असेल. वाहत्या पाण्यात उभे असता, पाणी अंगाला वळून पुढे जाताना किंचित थरार वाटतो तसे काहीतरी. सरकणारे पाणी आपणाला जाणवते, ते त्या थरारामुळे. तुमच्या पुस्तकामुळे पुष्कळशा आठवणी डचमळतील, एक कवडसा सुखदु:खाच्या क्षणांवर फिरेल...

एक गोष्ट सहज जाणवली. एके ठिकाणी इलकल लुगड्याने रवकवीवर विजय मिळवला आहे ! फार वर्षांपूर्वी मी मुद्दाम इलकलला गेलो होतो. त्या वेळी सूर्यप्रकाशाने झळझळणारे रेशमी रंग मी पाहिले होते. पण हे खानदान असलेले वस्त्र आता दुर्मिळ होत चालले आहे, अगदी इलकललादेखील पिढ्यान् पिढ्या तो व्यवसाय करणारी कुटुंबे परागंदा झाली आहेत. काही वर्षांनी ते महावस्त्र पाहायलादेखील मिळणार नाही.

शांता शेळके आता मुंबई सोडून पुण्यालाच स्थायिक होण्याच्या उद्देशाने आल्या आहेत. पूर्वी त्यांच्याशी मधून मधून पत्रव्यवहार होताच. त्या येथे आल्यावर दोन-तीनदा फोनवर दीर्घ बोलणी झाली होती. जर तुमची हरकत नसेल तर तुमच्या कवितांचे पुस्तक त्यांना दाखवण्याचा मी विचार करतो आहे. प्रकृती अस्वास्थ्यामुळे social meetings मी आणखी तीनचार महिने पुढे ढकलणार आहे. त्यामुळे त्यांची प्रत्यक्ष भेट होण्यास वेळ लागेल हे खरे.

श्री. हातकणंगलेकर हे दोनदा येथे भेटले होते.

पुस्तकाबद्दल पुन्हा एकदा आभार.

कळावे.

आपला

जी. ए. कुलकर्णी

अनुक्रमणिका

G. A. Kulkarni
Pune-29.
3-2-87

श्री. जोशी यांस–
स. न. वि. वि.

तुमची दोनही पत्रे मिळाली.

पत्रातील एकाद दुसरे वाक्य वापरण्यास हरकत नाही (असे एखादे वाक्य वापरताना संदर्भ तुटल्यामुळे अर्थदुष्टता येण्याची शक्यता असते. पण या ठिकाणी तसे काही घडणार नाही.) पण माझे एक पूर्णपणे वैयक्तिक मत असे की, इतरांच्या चांगल्या-वाईट मतांना फारशी किंमत असू नये. माझ्या काही पुस्तकांवर इतरांची मते छापली आहेत हे खरे. पण त्याबाबत माझा कोणताही संबंध नाही. ते कार्य प्रकाशकाने केले आहे.

'स्वागत' साठी तुम्ही लिहिणार याची गंमत वाटली. ललितमधील हे सदर चांगल्याच उद्देशाने सुरू झाले होते. पण अगदी नवख्या लेखकांनी (किंवा एकाद-दुसरे पुस्तक नावावर असलेल्यांनी) फार मोठे दावे मांडायला सुरुवात केली व थोडया प्रमाणात ते सदर बदनाम झाले. पु. ल. देशपांडे यांनी ललितच्याच एका दिवाळी अंकात त्याचे मार्मिक विडंबनदेखील केले. आज तर आम्हाला 'स्वागत' पेक्षाही हे विडंबनच जास्त लक्षात राहिले आहे.

मला वाटते, (आणि हे सुद्धा केवळ वैयक्तिक मत) की लेखकाच्या बाबतीत वर्तमान, भविष्य या काळांना फारसे महत्त्व नाही. प्रस्तुत आहे तो भूतकाळ. मी अमुक लिहीत आहे, तमुक लिहिणार आहे या माहितीला काहीच जाहीर अर्थ नसतो. मी अमुक लिहिले आहे, हेच तेवढे महत्त्वाचे असते. बऱ्याच वर्षांपूर्वी खांडेकरांच्या पुस्तकात आगामी या शीर्षकाखाली पंधरावीस कादंबऱ्यांची मोठी यादी असे व तो प्रकार त्या काळीदेखील विनोदी वाटत असे. स्वतःला अगदी निःसंकोच स्वत्वाची (थोडी) जाणीव असावी, आपले अस्त्र (किंवा वाद्य म्हणा हवे तर) कोणते याचे भान असावे, त्याप्रमाणे त्याहीपेक्षा जास्त म्हणजे विनय असावा.

क्षमा करा, उपदेशाचा मोह अनेकदा आवरत नाही. पण उपदेश करण्याचा माझा मुळीच उद्देश नव्हता. सहज बोलताना मी बोलून गेलो इतकेच.

कळावे.

आपला
जी. ए. कुलकर्णी

## पद्माकर गोवईकर यांना आलेली जीएंची पत्रे

G. A. Kulkarni
Dharwar
27-7-74

स. न. वि. वि.

मी जोशी यांना जूनच्या पहिल्या आठवडयात पाठवलेले पत्र त्यांना न मिळाल्याने बराच घोटाळा झाला. पाचसहा दिवसांपूर्वी पत्र पुन्हा पाठवण्याच्या वेळी त्यांचे पत्र आले, व त्यामुळे हा घोटाळा ध्यानात आला.

एकंदरीने 'प्रदक्षिणा' बाबत आपणाला परवानगी देता येणार नाही, याबद्दल क्षमस्व. तशा तऱ्हेचे पत्र मी जोशी, (व नव्याने लिहिणारे किवळकर) यांनाही पाठवले आहे. कारण सध्या त्या कथेच्या हिंदी भाषांतरा (आणि रेडिओ एकांकिका इत्यादी) विषयी मुंबईहूनच एक सूचना आली आहे. अशा तऱ्हेने सर्वच हक्क एकत्र दिल्याने माझ्या दृष्टीने ते सोयीचे होणार आहे. कदाचित त्यातून एकांकिका वा भाषांतर होणारही नाही. पण मानधनाची lump amount आधी मिळणार असल्याने त्याबद्दल माझी तक्रार नाही. नाहीतरी नाटकाविषयी मी फारसा उत्सुक नाहीच.

या पत्राने आपली थोडी गैरसोय होईल. पण त्याबाबत इलाज नसल्याने आपण क्षमा करावी. कळावे.

आपला
जी. ए. कुलकर्णी

G. A. Kulkarni
Dharwar
16-7-74

स. न. वि. वि.

आपले पत्र मिळाले.

'प्रदक्षिणा' या कथेच्या एकांकिकेत रूपांतराबद्दल मी आधीच मुंबईच्या एका जोशी नावाच्या व्यक्तीला आधीच परवानगी दिली आहे. पण ती दोनतीन महिन्यांमागची गोष्ट आहे. मी त्याला एकदोन दिवसांत पत्र लिहून ती मुक्त करून घेईन. तेव्हा

आपण साधारण ऑगस्टच्या पहिल्या आठवड्यात स्मरणपत्र पाठवल्यास बरे होईल.

तुम्ही समजता तेवढी इस्किलार आकारहीन नाही. त्यातील प्रत्येक व्यक्ती एका विशिष्ट जीवनविषयक दृष्टिकोणाचे प्रतीक आहे. व त्यात मध्यवर्ती सूत्र आहे ते Sophoclean Greek Tragedy चे.

आपल्या नाटकाचे हस्तलिखित वाचणे मला जमेलसे वाटत नाही. तो माझा वाङमयप्रकार नव्हे. क्षमस्व.

आपला
जी. ए. कुलकर्णी

जी. ए. कुलकर्णी
कडेमनी कंपाउंड,
माळमड्डी, धारवाड
ता. २६-११-६२

स. न. वि. वि.

तुमचे मनमोकळे पत्र वाचून मला फार आनंद झाला. पण हे खरे असले तरी तुमच्या स्तुतीमुळे मी फार खजिल झालो, हेही तितकेच खरे आहे.

एक गोष्ट मला विशेष समाधानाची वाटली. 'पारवा' हे माझ्या कथा-संग्रहाचे नाव (त्यापूर्वीच्या 'निळासावळा' प्रमाणेच) बालकवींकडून उचलले आहे हे तुम्ही ओळखलेही. माझ्या कथा आवडणाऱ्यांनाही कित्येक वेळा हे मला सांगावे लागले आहे.

तुमच्या कथा दीपावलीत प्रसिद्ध झाल्या ही कौतुकाची गोष्ट आहे. पण त्या माझ्या पाहण्यात आलेल्या नाहीत. दुर्दैवाने मासिकांच्या बाबतीत मी जरा आडगावी पडल्यासारखा आहे. सुट्टीत बेळगावला गेलो म्हणजे मात्र ती सारी पाहायला मिळतात.

मार्गदर्शन करण्याचा हक्क फार मोठ्या लेखकांचा असतो. इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास हा धंदा व छंदही असल्याने आपल्या मर्यादांची मला नेमकी व अत्यंत स्पष्ट जाणीव आहे. शिवाय वाङ्मय हे प्रत्येकाच्या स्वतंत्र जीवनातील सुखदुःखाचं, तळमळीचं फळ असतं. तो आनंद– आणि ती शिक्षाही– प्रत्येकानं स्वतंत्रच भोगायचा आहे. तेथे सल्ला कोण कुणाला देणार ? आपण खासगी संभाषणाप्रमाणे अर्थात खूप बोलू शकू. पण कृपया त्याला मार्गदर्शनासारखे फार मोठे नाव देऊ नका. जर पुण्याला आलो तर– मी पुष्कळदा मुंबईला जातो. शिवाय पुण्याला माझे खूपच मित्र

आहेत—तर मी तुम्हाला जरूर कळवीन. असल्या बाबतीत लिहिण्यापेक्षा अनौपचारिक गप्पा मारणे जास्त चांगले.

बराय. पत्राबद्दल पुन्हा आभार.

आपला,
जी. ए. कुलकर्णी

G. A. Kulkarni,
Dharwad- 7
9th April 1983

सप्रेम नमस्कार वि. वि.

आपले पोस्टकार्ड मिळाले. श्री. हातकणंगलेकरांनी आपल्याला दिलेली माहिती बरोबर आहे. श्री. भटकळ यांच्याकडे वळवलेल्या हक्कांत कथाकथनाचाही समावेश असल्याने प्रस्तुत बाबतीत माझा कसलाही व्यावहारिक संबंध येत नाही. तुम्ही जो निर्णय घ्यायचा, तो त्यांच्याशीच चर्चा करून घ्यायचा आहे.

तुमच्या पत्रात कसलेही औद्धत्य मला दिसले नाही, त्याप्रमाणे या माझ्या पत्रातील काही अनाहूत मतांबद्दल आपणही राग मानू नये. इतर तिघांनाही असाच एक विचार सुचला होता, त्या वेळी देखील (पण त्यांच्या सूचनेमुळे) मी त्यांना माझे मत कळवले होते. त्यांच्याप्रमाणेच (कदाचित) तुम्हीदेखील राग मानणार नाही, असे वाटते.

कथाकथनाचा अवतार (की सोंग ?) माझ्या कथांवर कितपत योग्य तऱ्हेने बसेल याविषयी मला शंका आहे. लोकप्रिय कथाकथनासाठी एक विशिष्ट तऱ्हेची कथा जरूर असते. श्रोता येऊन खुर्चीत बसला, त्या क्षणापासून कथा संपेपर्यंतच्या अल्पकाळातच ती वाढली पाहिजे, सोसेल तेवढी नाटयमयता (किंवा नाटकीपणा) तिच्यात यायला हवी, आणि तेवढयातच विनोदी कलाटणीने अथवा हळव्या उसाशाने ती संपली पाहिजे. एखादी चंद्रज्योत जळावी, काडी ओढताच लाल अथवा हिरवा प्रकाश दिसावा त्याप्रमाणे. माझा प्रयत्न निराळा आहे. तशा कथा लिहाव्यात असा माझा कधी हेतूच नसल्याने तसा माझा कधी प्रयत्नदेखील नव्हता. शिवाय मुळातच तशा कथा लिहिण्याची देणगी मला नसल्याने माझा विचार त्या दिशेने कधी वळला नसेल. ओलसर अंधारात मुळांनी धडपडत राहावे, व मग कधीतरी वरच्या बाजूला वीतभर उंचीचे रोपटे दिसावे, एखादुसरे पान यावे, किंवा गवताचे पातेदेखील उभे राहावे, एवढी माझी धडपड होती. हेदेखील नेहमीच साधते अशातील

अनुक्रमणिका



भाग नाही. (मग त्यातून भव्य देवदार निर्माण व्हावे, हे तर अशक्यच. ते भाग्य केवळ प्रतिभावंतांना लाभते. आणि आपल्याकडे तर व्यासांनंतर मला कुणी प्रतिभावंत दिसतच नाही.) आणि त्यात नाट्यमय काही नसते. प्रत्यक्ष कथाकथन केलेल्या एका व्यक्तीबरोबर मी सहज या विषयावर चर्चा केली. मी विचारले, "तुम्ही कथाकथनासाठी रेगे यांच्या 'चंद्र सावली कोरतो' या कथेची निवड कराल का?" तर तिने निःसंशय मान हलवली, व त्याबरोबरच माझ्या कुठल्याही कथेची आपण निवड करणार नाही, असेदेखील मला सांगून टाकले. या त्यांच्या मताचा आपण जरूर विचार करावा, कारण त्यामागे प्रत्यक्ष अनुभव आहे. त्याशिवाय त्या कथा तशा स्वरूपाच्या कथनासाठी योग्य नाहीत, कारण त्या हेतूने त्या लिहिल्या नाहीत. असे माझेदेखील वाङ्मयीन मत आहे.

मला प्रत्यक्ष हजर राहताच येणार नाही, याबद्दल क्षमा करावी. गेली पाच-सहा वर्षे पोटदुखीचा त्रास असल्याने मला प्रवास जवळजवळ वर्ज्यच आहे. आणि ती अकस्मात जागी होत असल्याने अमुक वेळी, मी अमुक करू शकेन, असा आता मला विश्वास उरला नाही. त्याच कारणामुळे मी अलीकडे दिवाळी अंकांची आमंत्रणेसुद्धा स्वीकारली नाहीत.

आपल्या पत्राबद्दल आभार.

कळावे.

आपला
जी. ए. कुलकर्णी

## श्री. शंकर सारडा यांना आलेली जीएंची काही पत्रे

Dharwar
Date 20-9-77

प्रिय श्री. सारडा,

तुम्ही फार अगत्याने पाठवलेले आपले पुस्तक 'गुलमोहोर' मिळाले. मी त्याबद्दल फार आभारी आहे. त्या निमित्ताने हे पत्र. मात्र ते केवळ निमित्तच आहे हे ध्यानात असू द्या. नाहीतर पत्राचे कारण आणि पत्राचा विषय यात थोडाही बंसंध शोधता शोधता अनेकजण माझ्या पत्रांच्या बाबतीत हताश होऊन गेले आहेत

प्रथम एक किरकोळ गोष्ट. तुम्ही पत्त्यावरील माझ्या नावात G. A. च्या ऐवजी G.K. असा फरक केला आहे. इतर वेळी या गोष्टीला काहीच महत्त्व नव्हते. पण योगायोगाने येथून चार वाठारे सोडून G. K. Kulkarni नावाचा एक माणूस खरोखरच आहे, व त्याचा पत्ता Kadewal Compound असा आहे. पोस्टमन प्रथम आमच्या घरावरून जात असल्याने अनेकदा त्याचे टपाल मला तिकडे पोहोचवायचा उपद्‌व्याप करावा लागतो. (पोस्टमनना शिव्या देण्याचे काम मी कधीच सोडले आहे. ते इतके शामळू आणि भेदरट आहेत की, त्यांच्याकडे पाहिले की वाटते की, त्यांच्या हातांतील पत्रे घ्यावीत व सरळ आपणच बटवडा करून यावे ! )परवाच मी त्याचे ज्योतिषविषयक एक मासिक, 'सुमती प्रसूत होऊन पुन्हा मुलगीच झाली, ' एवढाच मजकूर असलेले एक पोस्टकार्ड आणि मुंजीची एक आमंत्रणपत्रिका देऊन आलो. पण या खेपेला मात्र त्याने माझी जिरवली. तुमचे पुस्तक प्रथम त्याच्याकडे गेले, व त्याने अत्यंत स्पष्ट अशा विजयी आनंदाने मला आणून दिले ! हे काहीच नाही. बेळगावला असताना आमच्या गल्लीतच एक जी. ए. कुलकर्णी वकील होते. तेथे तर त्या गृहस्थाचे पक्षकार खेड्यांतून येऊन रात्री अकरा-बारा वाजता दार ठोठावत ! आमच्या घरमालकाची Kademani Building नावाची एक इमारत आहे. परवापर्यंत तेथे गुरुनाथ कुलकर्णी नावाचा गृहस्थ राहत होता. गेली चार वर्षे तो External M.A.(English) परीक्षेला बसायचा प्रयत्न करत असे. Elizabethan नाटके इतक्या काळजीपूर्वक वाचलेला माणूस मी पाहिला नाही. पण इंग्रजी वाङ्मयाचे ज्ञान तेवढेच मर्यादित. त्या काळा-नंतर इंग्रजी वाङ्मय रानशेणीप्रमाणे पार निर्जीव. मग हा एम.ए. होणार कसा ? पण साधारण पंचवीस माणसांबरोबर तर त्याने कर्कशपणे वितंडवाद घातले असतील. नंतर बेळगावहून माझ्या एका मित्राचे पत्र आले. 'Elizabethan drama' तुला कितीही आवडत असला, तरी तू त्याबाबत इतकी भांडाभांडी करत राहावेस हे बरे नाही, इत्यादी इत्यादी. माझेही नाव गुरुनाथ असल्याचा हा परिणाम ! हा गृहस्थ धारवाड सोडून गेला हे बरेच झाले. पुणे विद्यापीठाला कुणीतरी जी. ए. कुलकर्णीने मोठी पन्नास हजारांची देणगी दिली, तेव्हा देवीदास बागुलांनी अभिनंदन केले ते माझे ! पैसे जास्त आनंदाने खर्च करण्याचे कमीत कमी शंभर मार्ग मला माहीत असता मी अशी एखादी देणगी देऊन दानशूर होईन, असे माझ्याविषयी थोडीदेखील माहिती असणाऱ्या कुणालाही वाटणार नाही. अशा वेळी मात्र वाटते की, आपले नाव मोगलगिद्दीकर अथवा ढग्गमवार असते तर सोयीचे झाले असते ! रांगणेकरांच्या कुठल्यातरी नाटकात एक वाक्य आहे– 'शिरसाट ? अरे, हे काय आडनाव आहे की तारेचा पत्ता आहे ?' पण मी मात्र– अशा वेळी– हेदेखील आडनाव स्वीकारले असते !

तुमच्या पुस्तकात खूपच लेखकांचा उल्लेख आहे. असाच एक प्रवास मी केल्यामुळे थोडया आठवणी जाग्या झाल्या. त्यांतील काही आज मला विशेष महत्त्वाच्या वाटत नाहीत. आणखी काही नावे जरूर यायला हवी होती असे वाटते. (उदा. Kazantikas Last Temptation of Christ; Zorba the Greek; Andre Mulraux; Mauriac, Magic Mountain लिहिणारा Thomas Mann इत्यादी.)

खलील जिब्रानविषयी आजचे माझे मत तुमच्यासारखेच आहे. पण एकेकाळी त्याची सगळी पुस्तके, Barbara या त्याच्या शिष्येने लिहिलेले त्याचे चरित्र, सारी विकत घेऊन वाचली होती. त्या हिरवट Green salad days मध्ये टागोरांनीदेखील हीच भूल टाकली होती. पण जिब्रान काय, टागोर काय, ते लेखक नाहीत तर आपल्याच मनाची एक अवस्था आहे. आज मला ते दोघेही फार thin वाटतात. Evil ची अटळ, रुद्र जाणीव त्यांच्यात नाही. Evil ला माया, अज्ञान किंवा प्रेमाचेच एक रूप समजून त्यांचे कसे समाधान होऊ शकले, याचे मला आश्चर्य वाटते. दोष अर्थात माझ्यात आहे. मी अगदी मातीचा, मातीतला आहे. त्यामुळे शरच्चंद्र हा माझा एक कायमचा असाध्य blind spot आहे. पहिल्या खेपेला मी mature नाही, असे वाटले. दुसऱ्या वेळी मला त्या पवित्र मठात अस्पृश्या-सारखे वाटले, व मी तो नाद सोडला. साध्या कुंभारी मडक्यावर Greek marble urn ची चित्रे उमटणार नाहीत. ओल्या पावलांच्या उमटलेल्या आकृतीवर लांब चेहऱ्याने फूल वाहणे, मनातील एका कोपऱ्यात हळवे प्रेम घालून त्यावर उसासाने फुंकर घालणे इत्यादी गोष्टी माझ्या Radio set वर येतच नाहीत. म्हणजे देवदासला शांतारामचे उत्तर माणूस– Life is for living. मी बायबल मानतो, असे नव्हे. जणू Living मध्ये प्रेम असू शकत नाही, Life म्हणजे चार-चौघांप्रमाणे लग्न करायचे, Promotion मिळवायचे एवढेच, हा भयानक, Smug, Philistine अर्थ तर मला देवदासपेक्षाही जास्त अस्वस्थ करणारा वाटतो. (उलट पाथेर पांचाली या बंगालीच चित्रपटातील दोन प्रसंग तर शब्द निर्जीव वाटावेत इतके मला moving वाटतात.) आजही देवदासविषयी माझी तक्रार अशी आहे की त्याला कुठेही स्वत्वाचा कणखर मणका नाही– जो प्रेमातही माणसाला हवा असतो. प्रत्येकाने शांतारामचे जाड गेंडा कातडे वाढवणे ही आपत्तीच ठरेल, पण देवदास मात्र साधी मानवी त्वचाही काढून टाकून थंड वाऱ्यात बसल्या-सारखा वाटतो. जमिनीवर सांडलेल्या रक्तात स्वत्वाचे किंवा Self-pride चित्र असते, पण ते कशासाठी तरी झुंजताना सांडलेले असावे, मग ते steinbeck च्या कोणत्या तरी एका कथेत एक पोर गिधाडाबरोबर झगडताना जखमी होते, त्या वेळचे असेल, भर उन्हात वाळूवर सांडलेले Matador चे असेल, अगर डोळे

खोचून काढल्यामुळे चेहऱ्यावर ओघळलेले Oedipus चे असेल. कुणीतरी तसराळ-भर रक्त आणून रस्त्यावर टाकलेले नसावे. देवदासमध्ये मला जाणवले ते एक प्रकारचे अस्वस्थ करणारे कारुण्य; आणि शोकान्तिकेच्या धारदार पात्याशिवाय कारुण्य म्हणजे निर्जीव धडाच्या लिवलिबीत. अंगात बोटे खुपसत बसल्यासारखे आहे, असे वाटण्याइतके माझे मन गोणपाटी आहे. वृत्तीने, वाचनाने शरच्चंद्रांच्या चांदण्यात पाऊल टाकायला मी पूर्ण नालायक आहे. Joyce विषयीदेखील तेच. मी ते पुस्तक पाहिले आहे, इतकेच नव्हे, तर थोडा भाग वाचलाही आहे. Book of the century वगैरे वर्णनेही धंदेवाईक वाचनात आली आहेत. Odessey च्या Ulysses च्या आकृतिबंधावर ते पुस्तक आहे इत्यादी. पण ही गोष्ट का महत्त्वाची आहे, हे मात्र कुणी सांगितले नाही. शेवटी उरते काय, तर निरनिराळया भाषांतून आणलेल्या शब्दांच्या श्लेषांचा गुंतवळा. Jackson Pollock सारख्या चित्रकाराचे एक चित्र. म्हणजे Cactus हातात धरल्यावर (आणि हा माझा खरा अनुभव बरं का. एकेकाळी मी cactus चे पंचवीस-तीस नमुने वाढवले होते.) नंतर हातात अनेक बारीक काटे, कुसळे रुतल्यासारखे वाटते. नंतर ती सगळी काढून टाकल्यावर एकदम मोकळे वाटते. तो Relief एवढाच Joyce चा आनंद. (पण त्यामुळे झाले आहे काय तर त्याच्या Dubliners या कथासंग्रहाकडे दुर्लक्ष होते. त्यातील The Dead ही कथा फार श्रेष्ठ दर्जाची आहे.) Beckett विषयी मात्र मला पहिल्यापासूनच अत्यंत स्पष्ट अरुची आहे. त्याची मी नाटके वाचली, Molly इत्यादी कादंबऱ्या वाचल्या, पण communication निर्माण झाले नाही. Waiting for Godo मध्ये मात्र अस्वस्थ करण्याचे सामर्थ्य आहे. एकजण आपल्या मित्राची राख एका पुडक्यात घेऊन जात असता Pub मध्ये थांबतो, तेथे त्या पुडक्याची फेकाफेक होते व शेवटी मूत्र, वांती, शिळी सांडलेली बीयर यावर ती राख सारी उधळून पसरते. असले कादंबऱ्यांतील एक-दोन प्रसंग मनात राहतात; पण तेवढेच. हवेवर हवेतच वाढणाऱ्या Orchids मधील दंवबिंदू पिऊन धुंद होण्याची तरलता मला दैवाने दिली नाही, पण म्हणून काही समोरच्या प्लेटमध्ये निव्वळ कोरडी खणखणीत हाडे मला चालत नाहीत. सगळीकडून कोंडले जाऊन आपण आता चिरडून जात आहोत ही भावना चिरडून जाण्याच्या क्षणीच भोगण्याचे सुखदेखील Beckett देऊ शकत नाही. होते काय, आपल्या नकळत आपण पाया-खालून राखेचे बनत येतो, व असे झाल्यावर जिभेच्या टोकावर राखेची चव येते, तेव्हा आपण राख झालो हे जाणवते.

आणखी एका (मला घाबरे करणाऱ्या) विषयाचा मी उल्लेख करतो. तो म्हणजे परदेशी नावांच्या उच्चाराचा. परवा सत्यकथेत Camus च्या outsid-er च्या एका भाषांतराचे परीक्षण आले त्यात French नावाचा इंग्रजी स्पेलिंग

प्रमाणे उच्चार लिहिल्याबद्दल अनुवादकाचे वाभाडे काढण्यात आले होते. विशेषत: French नावे तर धोबी पछाड घालण्यासाठीच टपून बसलेली असतात. त्यामुळे मी स्वत: त्यांच्या उच्चारांच्या भानगडीत न पडता सरळ Spelling च देण्याचा प्रयत्न करतो. French नावे पाहण्यासाठी असतात, उच्चारासाठी नाहीत! तुम्ही मेअरसॉल्ट हाच उच्चार दिला आहे. पण Jean चा उच्चार ज्यां असा फ्रेंच दिला आहे. Greek नावेदेखील अशीच धोक्याची. बहुतेक नावात शेवटचे E उच्चारायचे असते (पेनेलपी). त्यांतही ती लॅटिनमधून आली असल्यास जास्तच गोंधळ. Hercules हे लॅटिन नाव, मूळ Greek नव्हे. यातून काय मार्ग काढायचा कुणास ठाऊक. केळकरांच्या कुठल्यातरी लेखात Plutarch हा शब्द प्लूटार्च असा आहे, त्याचा फार तर Starch ला यमक म्हणून उपयोग होईल!

Koestler चा कोएस्टलर हा उच्चार बरोबर आहे? मला माहीत नाही. (त्या नावाने एक आठवण जागी झाली. प्रत्यक्ष भेटल्यामुळे याच्याविषयी जरा जास्त आपुलकी. मुंबई साहित्य संघात त्याला बोलावले होते, व केवळ योगायोगाने मी त्या वेळी तेथे होतो. गडद निळचा, किंचित हिंस्र डोळ्यांचा हा लेखक दिसण्यात फार Impressive आहे. चारमिनारसारखी सिगरेट नाही, हे त्याचे मत. इतके विविध अनुभव घेतलेला लेखक Kazantakis खेरीज मला आठवत नाही. Ka. चे अनुभव जास्त Spiritual होते. Buddhism, Hinduism चा त्याने अभ्यास केला, जग पालथे घातले, monasteris मध्ये दिवस काढले. Koe. हा man of action in action आहे. तो निव्वळ राजकीय लेखक नाही. त्याची Arrival and Departure ही कादंबरी– जिचा तुम्ही उल्लेख केला नाही– फार Disturbing आहे. Act of Creation, Sleepwalkers ही त्यांची कला व शास्त्रावरील मोठी पुस्तके, Last tribes of Israel वरदेखील त्याचे एक पुस्तक आहे. दुर्दैवाने Darkness at Noon ला जरुरीपेक्षा जास्त प्रसिद्धी मिळाली. Pro communism प्रचार जेवढा कंटाळवाणा होऊ शकतो तेवढाच Anti communism प्रचार देखील होऊ शकतो. खरे म्हणजे Nobel Prize मिळण्याच्या योग्यतेचा हा लेखक. पण Saul Bellow सारख्या फार तर Competent पण दुय्यम लेखकाला ते मिळते पण Koestler ला मिळत नाही याचा मला स्वत:ला उगाचच व निष्फळ राग येतो. पण दोनदा नाव जाऊनही Kazan लाही ते मिळाले नाही. इतकेच नाही, तर खुद्द त्याच्याच Greece देशात त्याची शवपेटी उचलायला चार माणसे मिळाली नाहीत. एका धिप्पाड खलाशाने एकट्यानेच ती उचलली, व जमिनीत सोडली!

वर्तमानपत्रांत लिहिल्यामुळे तुमच्या लेखनावर मर्यादा पडल्या. शिवाय एखाद्या लेखकाविषयी सविस्तर लिहिण्याचा तुमचा मूळात उद्देश नाही, हे तुम्ही

अनुक्रमणिका

स्पष्ट केले आहेच. पण त्यामुळे काही लेख जुजबी त्रोटक झाले आहेत. Dostoevsky वरील लेखात Brothers Karamazov, आणि विशेषत: The Grand Inquisitorचा उल्लेख असायला हवा होता. Long Day's Journey हे ओनीलचे सर्वश्रेष्ठ, Haunting नाटक. त्याला थोडे पुढे आणून बसवायला हवे होते, (A man for the misbgotton नव्हे– A moon) डिलन थॉमस हा अतिशय मोठा गद्य लेखकही होता. Portrait of an Artist as a Young Dog under the Milkwood Tree इत्यादी पुस्तकांत मध्येच एखादे असे वाक्य येते की, सारा परिच्छेद स्वत:च्या प्रकाशाने झळकतो. त्याच्या पुष्कळशा कविता समजत नाहीत हे खरे. खरे म्हणजे त्याच्या आयुष्याविषयीच इतके लिहिले गेले आहे की त्याच्याकडे अलिप्तपणे पाहताच येत नाही. मरण्याच्या आधीच तीन-चार दिवस त्याने एकामागोमाग वत्तीस पेग घेतले, Caitlin Thomas हिच्यावरोवरचे त्याचे आयुष्य, हे सारे वाचले की लक्षात राहतो तो माणूस. तो विझत जाऊन मेला नाही तर उफाळून संपून गेला. Van Gogh या चित्रकाराची पत्रे इतकी उत्कट आहेत की मला त्याच्या चित्रांकडे कधी एकटयाने पाहता येत नाही, कारण तो नेहमी त्यांच्याशेजारीच उभा असतो. (Strindberg च्या एका नाटकाचा उल्लेख To Damascus असा आहे. तो Road To D., असा हवा. पूर्वी Saul नाव असलेला एक ज्यू या रस्त्यावर साक्षात्कार होऊन जीजसचा निष्ठावन्त अनुयायी Paul झाला. या गोष्टीचा त्या नावाशी संबंध आहे Rilke वरील लेखात गुलाबाचा उल्लेख आहे. शेवटी गुलाबाचा काटा हाताला ओरखडून त्याला मृत्यू आला ही गोष्ट त्याच ठिकाणी आली असती, तर Irony साधली असती.

वाटाडया म्हणून हे सारे ठीक आहे, असे बाहेरचे वारे जरूर यायला पाहिजे. पण एक ( थोडी Liberty घेऊन) सांगायचे म्हणजे हे काही तुमच्या मानाने खरे नाही. हे पुस्तक वाचल्यावर मला वाटले, सतपाल रिंगणात आला, पण दंडावरची एक बेटकुळी दाखवून चालला आहे. मला अनेकदा वाटते, तुम्ही डोस्टोव्हस्की, ओ'नील, फॉकनर, किंवा Koestler यासारखे मोजकेच काही लेखक घेऊन त्यावर सविस्तर लिहावे. तसा जर तुमचा विचार होऊन काही ठरेल, तर आतापासूनच निदान एक वाचक तरी त्या पुस्तकाची अत्यंत उत्सुकतेने वाट पाहील याची खात्री असू द्यावी.

मात्र हे पत्र पाहिल्यावर आपण कुठल्याकुठे हे पुस्तक कर्नाटकात पाठवले, असे तुम्हाला वाटू लागेल यात शंका नाही. पण अशी काही नकळत चूक झाली नाही, तर तुम्ही माझ्या पत्राच्या तडाख्यात सापडला असता कसे ? थोडा हिंस्र का

होईना, त्याचा मला थोडा आनंद आहेच !

कळावे.

आपला,
जी. ए. कुलकर्णी

G. A. KULKARNI
DHARWAR-7
15.2.79

प्रिय श्री. सारडा,

तुमचे (व्यावसायिक तत्परतेचे) पत्र मिळाले. मागील एका पत्रात भटकळांनी तुमच्या नव्या कामाबद्दल लिहिले होतेच, त्यामुळे तुमचे पत्र जरी अनपेक्षित वाटले तरी कार्यकारी संपादकांचे पत्र तसे अनपेक्षित नव्हते.

माझ्या पुस्तकाच्या पुनर्मुद्रणाविषयी मला काहीच माहिती नाही. मी त्याबाबतचे सर्व हक्क भटकळांना देऊन टाकले आहेत हे कदाचित मी तुम्हाला लिहिलेही असेन. शिवाय माझी समजूत अशी आहे की, प्रत्येक पुस्तकातील काही निवडक कथाच पुन्हा छापण्याचा त्यांचा विचार आहे. भटकळ चोवीस किंवा पंचवीसला भेटण्याची शक्यता आहे, त्या वेळी संपूर्ण माहिती मिळेल.

इतर मजकुराविषयी लिहिताना माझे पत्र या खेपेला अतिशय उद्धट होणार आहे, त्याबद्दल क्षमा करावी.

आतापर्यंत मला कधीही किर्लोस्कर समूह मासिकांविषयी ओढ वाटली नाही आणि ही गोष्ट किर्लोस्कर मासिक ज्या वेळी फार लोकप्रिय होते तेव्हापासून खरी आहे. माझ्या (सुरुवातीच्या) कथा तेथून तात्काळ परत येत हे यामागचे खरे कारण नाही. कारण त्या काळात हे वैशिष्ट्य काही त्या मासिकाचे एकट्याचेच नव्हते ! बहुतेक सर्व मासिकांकडून साभार परतच्या चिठ्ठ्या मी जमवल्या होत्या. याला एकच अपवाद म्हणजे सत्यकथा. (भागवतांच्या आधीची आणि नंतरचीही.) नंतर तिकडे कथा पाठवावी असे आपणहून मला कधी वाटले नाही. (किर्लोस्कर आणि अंजलीला). मी मुळी लिहीतच असे इतके मर्यादित की, जवळच्या काही अंकांत लिहिल्यानंतर किर्लोस्कर समूह बाहेर ठेवणे मला परवडत असे. त्यावाचून काही अडले नाही, आणि किर्लोस्कर मासिकांचे तर नाहीच नाही. मला वाटते ही अरुची माझ्या स्वभावामुळे असावी. कादंबरीच्या प्रांतात फडके यांचे जे एक Plastic Age होते तेच मासिकांच्या बाबतीत किर्लोस्करांचे होते. तेथला तो

थिल्लर पुरोगामीपणा, (सकच्छ की विकच्छ ?), फेरीवाला कसा लक्षाधीश झाला ? या थाटाच्या मुलाखती, तेथील विद्रूप रेखाचित्रे सारेच Against the Grain वाटे. ते कधी पूर्णार्थाने वाङ्मयीन नव्हतेच. पण ज्या कथा येत त्या कशा वाचकांसाठी सोप्या, सोप्या, उद्योग उन्नती उत्साहवर्धक असत ! वाङ्मयाची वाजू मनोहरकडे असे. एकदा एका अंकावर मालती दांडेकरांचा पूर्ण चेहरा पाहिल्यावर मात्र आम्ही खचूनच गेलो. व्यावसायिक नीटनेटकेपणा, चटपटीत चलाखी, यामुळे भुलून जाण्याची देणगीच आम्हाला मिळाली नव्हती. त्याच सुमारास अभिरुची निघे. नेहमीच वेळेवर नाही, कित्येकदा केवळ Brown paper मध्ये टाचणलेली. पण आम्ही अगदी वाट पाहत असू. नंतर छंददेखील असेच ओढ लावणारे. नवी सत्यकथा तर पाहायला नकोच.

पण एवढ्यावरच भागले नाही. एकदा किर्लोस्करमध्ये 'आत्म्याची कसर' (किंवा अशाच नावाची) कथा आली. दिलीप चित्रे यांची एक कथा आली, तिला काढलेले चित्र किर्लोस्करांच्या पठडीमधील नव्हते. मी चौकशी केल्यानंतर समजले की केसरीच्या रविवार आवृत्तीला नवा जीव देणारे गोखले त्या ठिकाणी आले आहेत. हे गोखले एकदा मला धारवाडला भेटले होते. त्यांच्या एका पत्राला उत्तर देताना मी किर्लोस्कर समूहाविषयी माझे मत स्पष्ट कळवले, आणि इतक्या लोखंडी परंपरेत ते स्वतःच किती काळ सुखाने राहू शकतील याविषयी शंका प्रकट केली. गोखले यांनी ते पत्र किर्लोस्करांना दाखवले ही पूर्ण चूक केली. म्हणजे माझ्या मनात लपवून ठेवण्याजोगे काही होते असे नाही, पण खाजगी पत्र मला न दाखवता अन्यत्र प्रकट करणे हा Breach of Trust आहे असे मला वाटते. त्यामुळे किर्लोस्करमध्येही माझ्याविषयी मत फार गढूळ झाले. (माझे सगळे अंदाज नंतर खरे ठरले. गोखले तेथे राहू शकले नाहीत चित्रे यांच्या कथेच्या चित्राविषयी शंकररावांनी घटप्रभेहून निषेध नोंदवला, व 'आत्म्याची कात' (हो, नाव आठवले) या कथेवर वाचकांनी टीका केली. (मुलाबाळांच्या घरी जाणत्या कौटुंबिक मासिकात असली कथा इत्यादी इत्यादी. यापूर्वी अभिसारवरही अशीच पुष्पवृष्टी झाली होती.)

तेव्हा सांगायचे काय, तर या पार्श्वभूमीमुळे मला या मासिकाविषयी (तुम्ही तेथे आल्यावरही) फारशी ओढ वाटत नाही. त्यासाठी काही लिहावे अशी इच्छा होत नाही. आणखी एक महत्त्वाचे कारण आहे. तुमचे मासिक तरुणांसाठी आहे, आणि या विशिष्ट वर्गाविषयी मला एक वर्ग म्हणून फारशी जवळीक नाही. या तरुणांना मी फार जवळून गेली अनेक वर्षे पाहत आलो आहे. त्यांच्यातही आदर वाटण्याजोगे पंधरावीस तरुण भेटले, पण ते इतके वेगळे होते की हा तरुण वर्ग त्यांना कदापि आपले मानणार नाही. खुद्द मीच बहुधा भावडचा वालपणातून

करड्या मध्यम वयात एकदम आलो असेन. हा माझा फायदा की तोटा, हे पाहणाऱ्याच्या दृष्टिकोणावर अवलंबून राहील. Wilde ने अमेरिकेविषयी एक वाक्य लिहिले आहे– 'The only country in the world which has passd from a primitive stage to decadence without passing through the intermediate stage of civilisation.' माझ्याही बाबतीत ही सुसंस्कृत अवस्था आलीच नसेल, आणि त्यामुळे त्या अवस्थेतील थिल्लरपणा, बिनबुडाचा आत्मविश्वास, झुंडशाही, थोडक्या श्रमात जास्त परिणाम मिळण्याचा हव्यास, स्वाभिमानाचा अभाव, याविषयी सहानुभूती वाटत नाही. वयस्कपणा म्हणजे काही शतकृत्य नव्हे हे खरे. पण त्याच जोडीला केवळ तरुण असणे हे देखील काही फारसे मोठे Qualification वाटत नाही. Age is not an achievement, and youth is not a qualification.

तेव्हा सर्वच दृष्टींनी मनोहरमध्ये काही लिहिणे मला जमणार नाही.

कळावे.

आपला,
जी. ए. कुलकर्णी

G. A. Kulkarni
Dharwad—7
24-11-82

स. न. वि. वि.

ब‍ऱ्याच काळानंतर तुमचा संदेश, आणि तो देखील दिवाळीच्या निमित्ताने.

आपणास हे नवे वर्ष भाग्य, समाधान आणि यश यांनी बहरलेले जावो.

तुम्ही 'पराक्रम' हा शब्द वापरला आहे, तो उपरोधाने नाही, अशी मी (माझी अब्रू वाचवणारी) समजूत करून घेतो. अहो, कसला पराक्रम नि काय! लिहायचे तर कसे प्रचंड वृक्षाच्या बुंध्याप्रमाणे सामर्थ्यशाली, Interior decorators नाक मुरडतील, असे जिवंत, खडबडीत, स्वयंपूर्ण लिहावे. Dostoevsky च्या काही लेखनासारखे, O'neill च्या Emperor Jones सारखे. (तुम्ही Patrick White चे काही वाचले आहे का ? Voss किंवा Tree of Man ? Voss अनेक ठिकाणी सैल वाटते. White हा Dosteovsky, O'neill या class मधला नव्हे, पण तो जो हातोडा उचलतो तो चित्रातील हातोडा नसून खरा वजनदार हातोडा आहे, याविषयी मात्र शंका मला वाटत

नाही.) जाऊ द्या, कागदाच्या होड्या करणाऱ्यांनी Golden Fleece शोधायला निघालेल्या Argo जहाजाची उठाठेव कशाला करायची म्हणा !

प्रकृतीच्या त्रासाने मात्र वैतागलो. हा त्रास अनेकदा तीव्र नसतो, पण त्रस्त करण्याइतक्या सातत्याने आहे. तीनशे पानांचे पुस्तक वाचायला एकेक आठवडा लागू लागला आहे; म्हणजे पहा.

आणि तुमचे काय ? व्यवसायच सारा वेळ शोषून घेत आहे का ? नवीन काय– इंग्रजी– वाचले आहे ?

सौ. सारडा यांना नमस्कार कळवा.

कळावे.

आपला,
जी. ए. कुलकर्णी

## प्राचार्य हातकणंगलेकर यांना आलेले एक पत्र

(प्राचार्य म. द. हातकणंगलेकर, सांगली, यांना आलेल्या जीएंच्या अगदी शेवटच्या पत्रांपैकी एक. जीए इंग्लिशमध्ये बरीच पत्रे लिहीत. त्यांच्या इंग्रजी शैलीची कल्पना यावी म्हणून हे पत्र मुद्दाम देत आहो)

G. A. KULKARNI
Vasant Vihar-B
Kothrud, Pune-29
17th May 87

Dear H-R,

Of course I received your letter long time back, and many thanks for it. For the first time perhaps, I had a legitimate excuse, ( I mean, one that people may willingly accept) for the delay. You knew for a very-long time I was in search for a very small flat; but the job was not very easy, due to many require-

ments- that it should be near the Paithankar's house etc. Recently however Nanda purchased a small flat quite near, and I have shifted to it. It is entirely Nanda's affair, and I do not own a brick of it (metaphysically speaking, there are no bricks in it to own.) It is quite new, and on the same day as you had, we had वास्तुशांत.

It is tiny, by sprawling Dharwar or Belgaum standards. I have to be very careful about taking an extra piece of bread. I am ofraid of putting a part of the extended stomach outside. It has a number af facilities I cauld not even imagine in Dharwar. But still I yearn for Dharwar,and its informal casual houses(which are like the loose, careless North Karnatak turbans.) But by Poona standards, where people live, and live contentedly in two rooms, it is supposed to be good. I knew somthing about gardening, specially, vegetables and roses, but now I am afraid I have done all the gardening in my life. There is no patch here for nine rows of beans. I am not as greedy as Yeats, and three rows even would have been sufficient. But it is not so. In addition, women gather together every ten minutes on steps, and talk very loudly. TV sets are always shouting, as if they have permanent sound diarrhea. In short it is a house, a residence, not a home, though I am grateful to Nanda. But it finally means one thing- going back to Dharwad (for which I was yearning and the yearning will be always there) is now impossible.

I am glad that you have yoor new house ready (Before I forget,I want to mention one thing. As in alternative to Poona, I tried some places. I had been to वाई but the place,along with its river,has shrunk miserably मिरज has nothing to recommend it except its climate.

A house was offered in गुहागर, a beautiful place, but the sea climate is not very pleasant, and the general impression there, is that blokes who read books, and do not own cocoanut and mango gardens, just do not deserve to live in decent society !). You have got your house built according to your specifications, and I am sure it will be a home. I was a little amused however, when you offered a room with attached bath and all that for my stay. You see, you are having some flattering ideas about me. I was not born to such luxuries; mine has been a very homely (and happy) life, and through passage of time, I have continued to be a backwoods man. When once अनंतराव had been to Dharwad, he sat in the kitchen on a पाट and was quite at home. I do not need even that पाट. So do not frighten me by having such ideas about me.

My eyes are torturing me, and in addition (or as a result perhaps,) often I am getting hypertension. Some times I had to take mild tranquilizers too. At present I have no phone. My present residence is quite near Nanda's. Perhaps you remember, you had to take a right turn to go there. Right at the turn, near the culvert, वसंतविहार building stands on the left side. That is A; just behind that is वसंतविहार B. I am assured that in three months, it may not be impossible to get a phone, but I have second thoughts about it. I have not yet settled here. When I do, I will be writing again. Prabhavati sends her regards to you and family.

G. A. Kulkarni

P. S. : Next time, please let me have your new address. Now, I am using your college.

* * *

अनुक्रमणिका

# मॅक्बेथ : एक रचनात्मक विश्लेषण

प्रा. डॉ. आशा राजवाडे

शेक्सपियरच्या गाजलेल्या चार शोकात्म नाटकांमध्ये 'मॅक्बेथ' माझं पहिल्या-पासूनच फार आवडतं नाटक. हॅम्लेटसारखा अंतर्मुख नायक, किंवा राजा लियर-सारखा वृद्ध, घालवेडा नायक, किंवा अथेल्लोसारखा भावनोत्कट नायक यांच्या प्रमुख व्यक्तिरेखा असलेली आणि त्याभोवती उभी असलेली नाटके काही कमी तोलाची आहेत, असं नाही. पण काही ना काही कारणाने व्यक्तिगत अग्रक्रम निर्माण होतातच. त्यात 'मॅक्बेथ' शिकण्याचा व शिकवण्याचा असा दुहेरी योग आल्याने हे नाटक गेली तीस वर्षे माझा पिच्छा पुरवत आहे, असे म्हटले तरी चालेल. आणि हा मॅक्बेथ मला बरेचदा वर्गात म्हणजे शिकवताना सापडत गेलेला आहे. एका वाचनात किंवा एका वर्षात एखाद्या साहित्यकृतीचे मर्म आपल्या हाती लागले, असे कोणताच सुज्ञ अभ्यासक समजत नाही. जसजसे दिवस जातात, जसजसे आपण ती साहित्यकृती परतपरत वाचत जातो, तसतसे तिचे एक कालसंपृक्त रूप आपल्या मनात घडत जाते आणि त्यातून तिचे नवनवीन पैलू दृष्टीसमोर येत जातात. इतकंच नव्हे, तर साहित्याच्या अभ्यासाची दिशा दाखवण्याचे तिचे सामर्थ्यसुद्धा आपल्याला जाणवते. 'वर्गात सापडलेला मॅक्बेथ' (सत्यकथा, ऑगस्ट १९८०) असा लेख त्याच्या अस्तित्ववादी पैलूंबद्दल मी लिहिला होता. 'मॅक्बेथ' मधील पुनरुच्चारित शब्द-प्रतिमांचा परिपोष किती मनोज्ञ आहे हे पाहण्याचा हा प्रयत्न.

एके दिवशी, प्रतिमा, पुनरुच्चारित प्रतिमा साहित्यकृतीला आकार कशी देत जाते याची वर्गात चर्चा करीत असताना 'मॅक्बेथ' अगदी आपणहून माझ्यासमोर आले. त्यांतल्या एका ओळीवर लक्ष केंद्रित करून आपण सबंध नाटकाचे विश्लेषण करू शकतो, असे जाणवले.

शब्द अतिशय साधे आहेत. प्रथम वापरले जातात ते राजवधाच्या प्रसंगात. (अंक २ प्र. २) निद्रिस्त राजाचा वध करून मॅक्बेथ राजाच्या शयनागारातून बाहेर येतो. अगदी संमोहित अवस्थेत असल्यासारखा. योद्धा आणि राजदरबारातील

अनुक्रमणिका

एक विश्वासू मानकरी, ह्या त्याच्या मूळ व्यक्तिमत्त्वाशी राजवधाच्या अघोरी कृत्याचा मेळ बसत नाही. लेडी मॅक्बेथ तिथेच, खोलीच्या बाहेर उभी आहे. रक्ताने माखलेला खंजीर अन् रक्ताने माखलेला हात या अवतारातला मॅक्बेथ तिला दिसतो. त्याला काही विलक्षण आवाज ऐकू येत असतात– "मॅक्बेथने निद्रेचा वध केला आहे. आता मॅक्बेथ कधीही शांत झोपू शकणार नाही," असे शब्द. या मॅक्बेथचा आता वास्तवाशी संबंध तुटला आहे, तो आणि त्याची अपराधभावना मिळून आता एक वेगळेच जग तयार झाले आहे.

"जा, थोडंसं पाणी घे आणि हा मलीन पुरावा नष्ट करून टाक." असे लेडी मॅक्बेथ त्याला म्हणते.

"Go, get some water,
And wash this filthy witness
from your hands."

(अंक २. प्र. २-४६-४७)

त्याच वेळेला राजाला उठवायला आलेले मानकरी किल्ल्याचे द्वार ठोठावीत असतात. मॅक्बेथ अजूनही वधाच्या धक्क्यातून बाहेर आलेला नाही. रक्ताने माखलेले हात घेऊन तसाच उभा. एक विलक्षण जाण त्याच्या शब्दांतून उमटते :

"सागरेश्वराच्या साऱ्या समुद्राचं पाणी तरी
माझ्या हातावरचं रक्त धुऊन काढेल का ?
नाही; उलट हा माझा रक्तलांछित हातच
अथांग समुद्रांना रक्तवर्णी करून टाकील–
तो सागरहिरवा रंग लाल होऊन जाईल."

"Will all Neptune's ocean wash this blood
Clean from my hand? No, this my hand will rather.
The multitudinous seas incarnadine,
Making the green one red."

(अंक २, प्र. २, ६०-६३)

हे भीषण असहाय शब्द त्याच्या मुखातून बाहेर पडतात. ज्याच्या हातावरचे रक्त अजून वाळलेसुद्धा नाही, तो मॅक्बेथ कसल्या विदारक अनुभवातून जातो आहे याची जाणीव होते आणि ह्या क्षणापासूनच खुनी मॅक्बेथ मनावर ठसतो. हात, रक्ताचे डाग, थोडेसे पाणी व त्या पाण्याने रक्तलांछन धुऊन टाकणे– हात, रक्त, पाणी, धुणे– या चार शब्दांच्या उच्चारातून निर्माण झालेली शब्दप्रतिमा साऱ्या नाटकाला व्यापून टाकते. वर उद्धृत केलेल्या शब्दांत रंगप्रतिमासुद्धा अप्रतिम आहे.

इकडे दार ठोठावणे सुरूच आहे. या संपूर्ण प्रसंगात (अंक २ प्र. २) विलक्षण नाटय आहे– राज्यलालसा, बेइमानी, उतावीळपणा, हिंसा, अपराधभाव, पश्चात्ताप, चटके देणारी जाणीव, भीती, द्वारापलीकडचे जग, त्या जगाची शक्ती, नीती, अधिसत्ता, रात्र व दिवस यांच्या सीमेवरचा पहाटेचा प्रहर, सगळ्या तारा ताणलेल्या आहेत. एखादं मिनीट जात नाही तर लेडी मॅक्बेथ म्हणते:

"माझे हातसुद्धा तुझ्या हातांसारखेच रक्तरंजित आहेत, पण माझं हृदय मात्र तुझ्यासारखं पांढरं फटक नाही."

चल, आपण आपल्या शयनगृहात जाऊ या. थोडंसं पाणी आपल्याला या कृत्यातून मुक्त करून टाकील. मग हे सगळं इतकं सोपं आहे!"

My hands are of your colour, but I shame
to wear a heart so white...
retire we to our chamber.
A little water cleans us of this deed.
How easy is it then!

(अंक २, प्र. २, ६४-६८)

परत एकदा रंगप्रतिमासुद्धा, अशा तऱ्हेने पुनरुच्चारातून ही शब्दप्रतिमा आकार घेते व आपल्या मनात रुजते. या संवादाला सतत दार ठोठावण्याच्या आवाजाची पार्श्वभूमी मिळालेली आहे. रोनाल्ड गॅस्कोलच्या 'ड्रामा अँड रिॲलिटी' या ग्रंथात या राजवधाच्या प्रवेशाची, त्यातील ध्वनींवर आधारलेल्या रचनेची चिकित्सा मार्मिकपणे केलेली आहे.

बाहेरचं जग, तिथली न्यायभावना जणू काही मॅक्बेथला या क्षणापासूनच जाब विचारते आहे..

पाचव्या अंकाच्या पहिल्या प्रवेशात तेच शब्द परत येतात. लेडी मॅक्बेथच्या निद्राचलनाचा प्रवेश. हातात मेणबत्ती घेऊन वेडीपिशी झालेली लेडी मॅक्बेथ रंगभूमीवर प्रवेश करते. तिला निमिषमात्रही झोप लागत नाही. (दुसऱ्या अंकातील दुसऱ्या प्रवेशातील मॅक्बेथप्रमाणेच.) आणि अंधारही सहन होत नाही. तिचा तो दुःखाने भरलेला अविस्मरणीय चीत्कार :

"काय, हे हात कधीच निष्कलंक होणार नाहीत?"

अजून (या हातांना) रक्ताचा उग्र दर्प येतो आहे.

अरबस्थानातली सगळी अत्तरंसुद्धा या हाताला त्याचा मधुगंध परत देणार नाहीत.

अरेरे, अरेरे, अरेरे!"

"What? will these hands never be clean?

(5-1-42)

Here's the smell of blood still :
all the perfumes of Arabia
will not sweeten this little hand.
Oh, oh, oh !"

दुसऱ्या अंकात 'ए लिटिल वॉटर' असतं, आता 'धीस लिट्ल हॅंड' असतो. तेव्हा मॅक्बेथचा जो अनुभव असतो, तो आता लेडी मॅक्बेथचा असतो. तेव्हा सागरेश्वराच्या साऱ्या समुद्राच्या पाण्याचा उल्लेख असतो, तर आता अरवस्थानातल्या साऱ्या अत्तरांचा. शब्दांचे पुनरुच्चार, प्रतिमेचे पुनरुच्चार. शब्दांच्या आसाभोवती फिरवत फिरवत नाटकाला विस्मयकारक घाट दिला जातो.

कथानक पुढे जाते तसतसे त्यातून शब्दांना अधिक खोल, गंभीर निनाद प्राप्त होत जातात, की शब्दांच्या वेगवेगळ्या प्रसंगांत केलेल्या पुनरुच्चारातून नाटकाचा आकार घडत जातो हे सांगणेसुद्धा कठीण !

एकूण चार ठिकाणी तेच शब्द थोड्या फार बदलांसह वापरले जातात. ते शब्द आपल्यासमोर अधिकाधिक गंभीर अर्थच्छटा घेऊन येतात. त्यातून नुसते घटनांचे क्रम सूचित होतात, असं नव्हे, तर पात्रांच्या मनाच्या काहिली आपल्याला दिसतात; अपराधाने, पापाच्या कल्पनेने मॅक्बेथला व लेडी मॅक्बेथला कसे खाऊन टाकले आहे हे दिसतं. आणि हे सर्व प्रतीत होण्याचे कारण म्हणजे संस्कृतीचे संदर्भ. कोणत्याही शब्दांना विशिष्ट संस्कृतिमूल्यातच अर्थ राहणार आहेत. विशिष्ट नीतिपरंपरांतून, साहित्यपरंपरांतून शब्दांना त्यांचे अर्थ, त्यांची शक्ती मिळत असते. नाहीतर आपण सांडलेल्या मानवी रक्ताच्या डागांना इतके भयंकर महत्त्व येण्याचे काहीच कारण नाही.

एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशी, एका शब्दसमुच्चयाचा दुसऱ्या शब्दसमुच्चयाशी, एका कालघटिकेचा दुसऱ्या कालघटिकेशी, एका प्रवेशाचा दुसऱ्या प्रवेशाशी, मानवी कृत्यांचा मानवी नीतिमूल्यांशी, कालच्या आकलनाचा आजच्या आकलनाशी, राजवधपूर्व मॅक्बेथ व लेडी मॅक्बेथ यांचा राजवधोत्तर मॅक्बेथ व लेडी मॅक्बेथशी असे अनेक धागे जुळून जातात. या धाग्यांच्या परस्परसंबंधातून हे नाटक आकार घेत जाते.

शब्दांचे एकमेकांशी अनेक प्रकारचे संबंध असतात. एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशी व्याकरणात्मक संबंध असतोच, अर्थाधिष्ठित असतो, त्याखेरीज नादात्मक संबंध असू शकतो. रूढी, परंपरा यांवर आधारित संबंध असू शकतो. (उदा. मांजर आडवे जाणे) आणि नीतिमूल्यांच्या संदर्भातही संबंध असू शकतो, (उदा. करावे तसे भरावे, Blood for blood) 'मॅक्बेथ' मधल्या या विशिष्ट शब्दसमुच्चयात संपूर्ण नाटकावर प्रकाश टाकण्याचे सामर्थ्य आहे. शब्दांचे एकमेकांशी संबंध असतात तसे शब्दसमूहांचा पुनरुच्चार हासुद्धा एक संबंधच आहे. राजवधा-

अनुक्रमणिका

नंतर लगेच लेडी मॅक्बेथला वाटत असतं, 'थोडंसं पाणी घेऊन हा रक्ताचा पुरावा नष्ट करून टाकला की झालं–' पण पुढे तिच्या असं लक्षात येतं की, हा रक्तलांछित हात कधीच स्वच्छ होणार नाही. त्याला येणारा रक्ताचा दर्प कोणत्याही अत्तराने नाहीसा होणार नाही. या विशिष्ट उदाहरणात शब्दांमधे पुनरुच्चाराबरोबरच 'प्रतिवर्तना' चा संबंधसुद्धा (reversal of relationship) दिसतो. अशा प्रकारच्या विविध खुब्यांमुळे एखादे लिखाण 'साहित्य' या संज्ञेस पात्र होते. पूर्वापार चालत आलेल्या साहित्याच्या परंपरा, पूर्वापार रुजलेले संस्कृतिसंदर्भ आणि त्यांच्या चौकटीत एका शब्दापासून दुसऱ्या शब्दापर्यंत साहित्यकाराने घेतलेली झेप ह्या साऱ्यांच्या परस्परसमन्वयातून साहित्यकृतीचा आकार घडत जातो. किंबहुना आकार व आशय या दोन भिन्न गोष्टी नसतातच. आशयाची कलात्म मांडणी म्हणजेच आकार होय.

सर्वसामान्य माणसे दैनंदिन व्यवहारात प्रयोग करीत असलेल्या भाषेचे आणि साहित्याच्या भाषेचे व्याकरण एकच असते. शब्दसंग्रह सारखाच असतो. परंतु भाषेच्या अंतरी असणाऱ्या इतर कळा– नाद, प्रतिमा, पुनरुच्चार, अंतर्विरोध (irony), समरूपरचना (symmetry), विरोधात्मरचना (contrast), रूपके, आदिमकथांचे आयाम, आधीच्या साहित्यात वापरले गेल्यामुळे शब्दांना प्राप्त झालेले संकेताचे रूप आणि इतर साहित्यसंकेत– या सर्वांचा उपयोग करून साहित्यकृती निर्माण होत असते आणि म्हणून साहित्यकृतीच्या भाषेचा या सर्व पातळ्यांवर अभ्यास करणे आवश्यक ठरते.

(उद्धृत केलेल्या ओळींचे संदर्भ 'मॅक्बेथ' च्या केंब्रिज आवृत्तीतून घेतलेले आहेत. प्रथम प्रकाशन : १९४७, तृतीयावृत्ती– १९६७)

* * *

## साभार स्वीकार

### कविता

**फिनिक्स** : डॉ. स. ग. यादव; फिनिक्स प्रकाशन, कसबा– बावडा, कोल्हापूर; १९८८ रु. १३.

**ऋणानुबंधाचे मेणे** : दि. मो. दुधगावकर; साहित्य सहयोग प्रका-संस्था, कुडाळ; १९८७ रु. १८.

**लीळाचरित्र एकांक** : डॉ. कन्हैया कुंदप; सौ. कला कुंदप, कोपरगाव; १९८८ रु. २०.

# भाषिक व्यवहारातील विवेक
## (भाषा–शोधन) लेखांक पाचवा

डॉ. द. न. गोखले

### (१२)
#### शब्दान्त

यापूर्वीच्या भागात शीर्षबिंदूचा जेव्हा विचार झाला तेव्हा शुद्धलेखनदृष्टचा शब्दान्तांचाही काही विचार झाला. शब्दान्त म्हणजे शब्दाचा शेवट. शीर्षबिंदू अनेकदा शब्दान्ती येत असल्यामुळे शीर्षबिंदूच्या विचारात शब्दान्ताचा अंशतः विचार समाविष्ट होणे साहजिक होतो.

नव्या शुद्धलेखनानं मराठीतील सर्व रूढ शब्द स्वरान्त मानले आहेत.

देव, राक्षस, सुपारी, रामाची, पेरू, गेले, करून, जाऊ, करू, टाहो इत्यादी सर्व रूढ मराठी शब्द स्वरान्त आहेत.

गेलं, फुलं, त्यानं, पुढं वगैरे अंती बिंदू येणारे सर्व शब्दही स्वरान्तच आहेत. कारण त्यांत शेवटी 'प्रदीर्घ अकार' आहे. (क्वचित त्याचा कोमल नासोच्चार होतो.)

अर्थात, पश्चात, क्वचित, तद्वत, किंचित, दैववशात, श्रीमान, धीमान, बुद्धिमान, धनवान, विद्वान, भगवान, विद्युत, परिषद, संसद, सम्राट, साक्षात इत्यादी शब्द संस्कृतात व्यंजनान्त– अर्थात पायमोडके– आहेत. पण मराठीत ते रूढ असल्यामुळे स्वरान्त (अकारान्त) समजले जातात.

टेबल, हॅट, बॅट, बॉल, पेन, पेन्सिल, कोट, स्कर्ट, झंपर, ब्लाउज, पिन, प्लग इत्यादी इंग्रजी शब्द मराठीत रूढ आहेत. ते स्वरान्त (अकारान्त) लिहिले पाहिजेत.

मराठीत शब्दान्ती येणारा 'अ' जर प्रदीर्घ असेल तर त्याचे प्रदीर्घत्व शीर्षबिंदूने दर्शविले जाते, हे आपण बघितले. मराठीत शब्दान्ती येणारे बाकीचे 'अ' बहुधा निसरडे किंवा ओझरते किंवा निभृत उच्चारले जातात. उदाहरणार्थ, गवत, पेंड, हीन. म्हणजे अकारान्त शब्दाचा उच्चार जवळजवळ व्यंजनान्त शब्दासारखा

होतो. तेव्हा, ' अन्त्य व्यंजन ' आणि ' अन्त्य अकार ' यांमधील भेद अगदी पुसट होत असल्यामुळे तो लेखनात दर्शविण्याची आवश्यकता नाही, असा नव्या शुद्ध-लेखनाचा होरा दिसतो. ' विद्वान ', ' करून ' आणि ' वन ' या तिन्ही शब्दांतील अन्त्याक्षर ' न ', स्वरान्त लिहावे, असे नवे शुद्धलेखन सांगते.

नव्या शुद्धलेखनाचा हा होरा ध्यानी घेतला की, मराठीत ' बहुतेक सर्व शब्द ' स्वरान्त लिहिण्यास काही आडकाठी राहत नाही. अन्त्य पायमोड जवळजवळ काढून टाकली तरी चालते.

एम. ए., पीएच. डी., जॉनसन, वॉशिंग्टन, बॉब, हेंडरसन, एस. एस. सी. इत्यादी-लेखन शुद्ध ठरेल. परभाषेतून आलेले विशिष्ट शब्द मुळात जर व्यंजनान्त असतील आणि ते मराठीत रूढ झालेले नसतील तरच ते व्यंजनान्त अथवा पायमोड-युक्त लिहावे लागतील. उदाहरणार्थ, शास्त्रीबोवा नृत्य बघता बघता उद्‌गारले, ' अलम् ! अलम् ! '– या इंग्रजी कथेचे नाव आहे ' सेव्हन् ड्वार्फ्‌स् अँड् स्नोव्हाइट् '

मराठीत रूढ झालेले सर्व शब्द स्वरान्त लिहावेत, असा नव्या शुद्धलेखनाचा आदेश स्पष्ट आहे. शिवाय शब्द व्यंजनान्त आहे हे दर्शविण्याचाच उघड उद्देश नसेल तर शब्द शक्यतो स्वरान्त लिहावा, असा नव्या शुद्धलेखनाचा होरा दिसतो. हे नीट लक्षात न घेतल्यामुळे अनेकांच्या लिहिण्यात, नव्या शुद्धलेखनामध्येही, पुढीलसारख्या त्रुटी राहिलेल्या दिसतात. पश्चात्, सम्यक्, एम्. ए., कदाचित्. येथे शब्दान्ती पायमोडीची आवश्यकता नाही. (निश्चित् ' हा शब्द तर अकारान्तच आहे– संस्कृतात नि मराठीतही.)

सर्व शब्द स्वरान्त लिहिण्याचे सर्वसामान्य धोरण ठेवले तर नव्या शुद्ध-लेखनाप्रमाणे शब्दान्ताच्या अनेक चुका टळू शकतील.

' अन् ' हा शब्द व्यंजनान्त म्हणजे ' न ' चा पाय मोडून लिहावा ' असे क्वचित नव्या शुद्धलेखनावरील विवरणात सांगितले जाते. वास्तविक पाहता नव्या शुद्ध लेखनाचा तसा सुस्पष्ट आदेश नाही. मात्र ' अन् ' पायमोडका लिहिण्याचा बराच प्रघात आहे. तेव्हा ' अन ' आणि ' अन् ' हे दोन्ही पर्याय सध्याच्या प्रमाण मराठीत ग्राह्य समजणे योग्य होईल.

सर्व शब्द सामान्यतः स्वरान्त मानले म्हणजे लेखनात ऱ्हस्व-दीर्घचा प्रश्न शब्दान्ती फक्त इ–ई, उ–ऊ यासंबंधीच पुढे येतो. कारण तेवढ्याच स्वरांची ऱ्हस्व आणि दीर्घ रूपे लेखनात प्रचलित आहेत. नव्या शुद्धलेखनाने हाही प्रश्न फार सोपा केला आहे. नव्या शुद्धलेखनाप्रमाणे शब्दान्ती येणारा ई किंवा ऊ नेहमी दीर्घ असतो. उदाहरणार्थ,

मी, स्त्री, ही, आई, खाऊ, करी ( = करीत असे), रामाची, वायू, साधी, नीती, भीती, गुरू, ऋषी, इत्यादी.

अनुक्रमणिका

शब्द म्हणजे केवळ मूळ शब्द नव्हे. विभक्ती, आख्यात वगैरेंचे प्रत्यय लागून झालेले मूळ शब्दाचे जे रूप तेही शब्दच. 'गोविंदा', 'घर', 'चल', 'बोल' हे शब्द आणि 'गोविंदाची', 'घरी', 'चलू', 'बोलू' हेही शब्दच. शब्दाचा हा व्यापक अर्थ लक्षात घेतला आणि त्यापासून निष्पन्न होणारा शब्दान्ताचा व्यापक अर्थ ध्यानात घेतला की, 'शब्दान्ती येणारा ई, ऊ दीर्घ असतो,' हा नव्या शुद्ध-लेखनात फलित होणारा नियम किती समावेशक आहे, ते स्पष्ट होईल. या नियमाची समावेशकता ध्यानी घेतली की पुढीलसारखे छोटे छोटे नियम त्याच्या पोटात येतात आणि गतार्थ ठरतात, हे ओघाने येते.

'एकाक्षरी शब्द नेहमी दीर्घान्त असतात.' उदाहरणार्थ,स्त्री,मी,तू, वी इत्यादी.

'अन्त्य इकार-उकार नेहमी दीर्घ लिहावा.' उदाहरणार्थ, आई, सुपारी, दांड, बोरू इत्यादी.

'तत्सम शब्दही मुळात ऱ्हस्वान्त असले तरी मराठीत दीर्घान्त लिहावेत.' उदाहरणार्थ, कवी. गुरू, प्रीती, गती इत्यादी.

'व्यक्तिनामे, ग्रंथनामे, शीर्षके, सुटे शब्द वगैरे दीर्घान्त लिहावेत.' उदाहरणार्थ, हरी, अन्योक्ती, 'झुंजार त्रिमूर्ती, 'मराठी कवी', इत्यादी.

('शब्दान्ती येणारा ई, ऊ दीर्घ असतो' असा नव्या शुद्धलेखनाचा सर्व-सामान्य निष्कर्ष येथे सांगताना म. सा. महामंडळाचे १९६१ चे नियम आणि त्यांची १९७२ ची त्या नियमांची पुरवणी ही दोन्ही लक्षात घेतली आहेत.)

**अपवाद (१)**

'शब्दान्ती येणारा ई, ऊ, दीर्घ असतो' या सर्वसामान्य निष्कर्षाला नव्या शुद्धलेखनात एक अपवाद सांगितला आहे. तो असा: 'परंतु यथामति, तथापि, इत्यादी तत्सम अव्यये ऱ्हस्वान्त लिहावीत.' या अपवादाप्रमाणे अद्यापि, अति, इति, कदापि, किंतु, यद्यपि, संप्रति, यथाशक्ति इत्यादी तत्सम अव्ययेही ऱ्हस्वान्त लिहिली पाहिजेत.

(शब्दान्ती येणारा ई, ऊ, मराठीत नेहमी दीर्घ असतो, हा म. सा. महा-मंडळाचा सर्वसामान्य निष्कर्ष आहे. तो मुख्यत: प्रचलित प्रमाण मराठीतील उच्चारां-वर अवलंबून आहे. शिवाय, त्यामुळे शुद्धलेखन सुलभही होते. त्या निष्कर्षाला म. सा. महामंडळानेच तत्सम अव्ययांचा अपवाद केला आहे. तेव्हा, नव्या शुद्ध-लेखनात तो मानायला हवा. पण तत्सम अव्यये कोणी दीर्घान्त लिहिली तर ते म. सा. मंडळाच्या एकूण विचारधारेप्रमाणेच अशुद्ध का ते सांगता येणे कठीण आहे.)

(मात्र, नवे शुद्धलेखन मानणारी प्रचलित प्रमाण मराठी ज्याला अनुसरा-वयाची आहे अशा सर्वसामान्य मराठी भाषकाने शब्दान्ती ई, ऊ सामान्यत: दीर्घ लिहून यथामति वगैरे तत्सम अव्यये ऱ्हस्वान्त लिहिणे योग्य ठरेल.)

**अपवाद (२)** : 'शब्दान्ती येणारा ई, ऊ दीर्घ असतो' या सर्वसामान्य

निष्कर्षाला नव्या शुद्धलेखनात दुसरा एक अपवाद सांगितला आहे. तो असा की, 'आणि, नि ही उभयान्वयी अव्यये ऱ्हस्वान्त लिहावीत.' नव्या शुद्धलेखनाने हा अपवाद स्पष्टपणे दिलेला असून त्याला प्रधाताचा तर आधार आहेच, पण उच्चाराचाही काही आधार आहे. तेव्हा प्रमाण मराठीच्या लेखनात तो पाळावयास हवा.

## (१३)

### उपान्त्य स्वर : मुख्यतः तत्समेतर शब्द

संस्कृतातून मराठीत जे शब्द कोणताही विकार न होता, म्हणजे जसेच्या तसे आलेले आहेत त्यांना तत्सम शब्द म्हणतात. जे शब्द काही विकार होऊन आलेले आहेत त्यांना तद्भव शब्द म्हणतात.

उदाहरणार्थ वृक्ष, पाद, आलय, केंद्र, सचिव, ग्रंथ, पुस्तक इत्यादी शब्द तत्सम होत. केस (केश), कान (कर्ण), वहीण (भगिनी), मंदीर (मंदिर), रीत (रीति), जिवंत (जीवन्त), सुतक (सूतक) इत्यादी शब्द तद्भव होत.

मति, गुरु वगैरे संस्कृत ऱ्हस्वान्त शब्द मराठीत नव्या शुद्धलेखनाप्रमाणे दीर्घान्त होतात, हे यापूर्वी सांगितले आहे. याप्रमाणे ऱ्हस्वान्त शब्द दीर्घान्त होणे हा विकार अपवादात्मक मानावा; आणि त्या दीर्घान्त शब्दांनाही मराठीत सामान्यतः तत्सम मानावे. उदाहरणार्थ, मती, गुरू, ऋषी, साधू हे शब्द तत्सम होत, असे व्यवहारदृष्टया म्हणावे.

तत्सम आणि तद्भव हे संस्कृतातून मराठीत आलेल्या शब्दांचे वर्गीकरण शुद्धलेखनदृष्टया फार महत्त्वाचे आहे. कारण अन्त्य स्वर सोडता बाकीच्या स्वरांचे ऱ्हस्वदीर्घत्व तत्सम शब्दांत एका प्रकारच्या नियमांनुसार ठरते, तर तद्भव शब्दांत दुसऱ्या प्रकारच्या नियमांनुसार ठरते. हा फरक लक्षात न आल्यामुळे लेखनाच्या अनेक चुका होताना दिसतात.

आपण प्रथम तद्भव नि इतर मराठी शब्दांचा (म्हणजे तत्समेतर सर्व मराठी शब्दांचा) विचार करणार आहोत आणि नंतर तत्सम मराठी शब्दांचा विचार करणार आहोत.

तत्समेतर मराठी शब्दांच्या उपान्त्य स्वरासंबंधी म. सा. महामंडळाने जे नियम दिले आहेत ते सर्वसामान्य लेखनव्यवहारातही अपर्याप्त वाटतात. त्यांना पुरवणी जोडण्याचा उपक्रम श्री. मो. रा. वाळंबे आदिक अभ्यासकांनी केला असून तो उपयुक्त आहे.

(१) तत्समेतर अकारान्त शब्दांत जर 'अ'पूर्वी साधे व्यंजन असेल (म्हणजे संयुक्त व्यंजन नसेल) तर त्या शब्दातील उपान्त्य ई, ऊ दीर्घ असतो.

उदाहरणार्थ : खीर, वहीण, ऊस, माहीत, करून, वहिणीस, लिहीत, धरावीत, माहीत.

(२) तत्समेतर अकारान्त शब्दांत जर 'अ'पूर्वी संयुक्त व्यंजन असेल तर त्या शब्दांतील उपान्त्य इ, उ ऱ्हस्व असतो.

उदाहरणार्थ : भिल्ल, शिस्त, सुस्त,

(३) तत्समेतर अकारान्त शब्दांत जर 'अ'पूर्वी खणखणीत उच्चाराचा बिंदू येत असेल तर त्या शब्दांतील उपान्त्य इ, उ, ऱ्हस्व असतो.

उदाहरणार्थ : शिंप, चिंच, रुंद, सुंभ, वशिंड (वास्तविक पाहता शिम्प, चिन्च, रुन्द, सुम्भ, वशिण्ड असे लेखन केले तर ते याआधीच्या नियमात बसते. म्हणजे दुसरा नि तिसरा हे नियम भिन्न नसून एकच आहेत.)

(४) तत्समेतर शब्द जर अकारान्त नसेल तर त्या शब्दातील उपान्त्य इ, उ ऱ्हस्व असतो.

उदाहरणार्थ : किडा, विळी, मारुती, ठेविले, पाहिजे, पिऊ, धुऊ, करिता, टाकिला, पुठ्ठा, विनू, वकिल, झिजे.

(५) तत्समेतर शब्दाला (किंवा तत्सम शब्दाला) विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागून जो नवा शब्द तयार होतो, त्यात मूळ शब्दाच्या शेवटी येणारा ई, ऊ दीर्घच असतो. या नियमाने वरील चौथ्या नियमाला अपवाद होतो. मात्र हा नियम स्वत: निरपवाद आहे. अर्थात ऱ्हस्वदीर्घाच्या इतर कोणत्याही नियमाने याला छेद जात नाही. तत्सम शब्दांनाही हा नियम लागतो, हे ध्यानी घ्यायला हवे.

उदाहरणार्थ : खाडीला, खडूचा, राघूने, किडीचे, माडीही, वेलीने इत्यादी. (सर्व मूळ तत्समेतर शब्द– नव्या शब्दाच्या उपान्ती ई, ऊ.)

स्त्रीने, कवीला, अन्योक्तीच, गुरूही इत्यादी. (सर्व मूळ तत्सम शब्द. नव्या शब्दाच्या उपान्ती ई, ऊ.)

येथे उपान्तीचा विचार चालू असल्यामुळे वर उपान्ती ई, ऊ येणाऱ्या शब्दांची उदाहरणे दिली. पण हा नियम निरपवाद असल्याने उपान्त्यपूर्व 'ई, ऊ'लाही तो लागू पडतो.

उदाहरणार्थ : पिकदाणी– पिकदाणीवर, भूपाळी– भूपाळीमध्ये, गुरू– गुरूमध्ये, पेरू– पेरूवरती, साडी– साडीहून, भीती– भीतीमुळे, नदी– नदीवरती, नीती– नीतीस्तव, मृत्यू– मृत्यूनंतर, साधू– साधूमध्ये इत्यादी. (तत्सम आणि तत्समेतर शब्द. उपान्त्यपूर्व ई, ऊ.)

या तेराव्या विभागात, आतापर्यंत, आपण तत्समेतर शब्दांतील उपान्त्य 'इ-ई, उ-ऊ'चा विचार पूर्ण केला. आपण तत्समेतर शब्दांतील उपान्त्यपूर्व 'इ-ई, उ-ऊ'चा विचारही थोडासा केला. शिवाय तत्सम शब्दांतील उपान्त्य नि उपान्त्यपूर्व 'इ-ई, उ-ऊ'चा विचारही आपण जाता जाता केला. आता 'इ-ई, उ-ऊ'चा बाकीचा विचार आपण पुढील विभागात करू.

* * *

ग्रंथपरीक्षण :

# ज्ञानदेवांचा आत्मसंवाद

ह. श्री. शेणोलीकर

---

मराठीतील संतवाङ्मयाचे आकलन तत्त्वज्ञानाच्या अंगाने करणाऱ्या रा. द. रानडे, शं. गो. तुळपुळे, शं. दा. पेंडसे, सोनोपंत दांडेकर, भा. पं. बहिरट या अभ्यासकांच्या मालिकेत प्रा. डॉ. वि. रा. करंदीकर यांनी आपल्या आजवरच्या ग्रंथसंपदेने मानाचे स्थान मिळविले आहे. वामनपंडितांची यथार्थदीपिका, भगवतगीतेचे तीन टीकाकार, रामकृष्ण आणि विवेकानंद, या त्यांच्या ग्रंथांना विद्वन्मान्यतेबरोबर त्या त्या वेळी विविध पारितोषिकांचा सन्मानही प्राप्त झाला आहे. अशा तत्त्वज्ञानपर ग्रंथलेखनाला आवश्यक असलेली बहुविध व्यासंगामुळे प्राप्त होणारी पांडित्याची बैठक, तत्त्वविवेचक शैली आणि प्रौढ व प्रसन्न भाषा श्री. करंदीकरांना लाभली असल्याने त्यांचे सर्वच ग्रंथ (विद्वज्जड न होता) उद्बोधक व रोचक झाले आहेत. 'अमृतानुभवाचे एक दर्शन' घडविणारा त्यांचा 'ज्ञानदेवांचा आत्मसंवाद' हा ग्रंथही त्याला अपवाद नाही.

अडीचशे पानांच्या या ग्रंथाची मांडणी लेखकाने उपन्यास, आत्मसंवाद व उपसंहार अशी तीन भागांत केली आहे. उपन्यास हा पन्नास पानांचा पहिला भाग दोन प्रकरणांचा आहे. त्यातील पहिल्या प्रकरणात ज्ञानेश्वरांच्या लोकविलक्षण चरित्राच्या आधाराने त्यांच्या 'अलौकिक आणि अपार्थिव' व्यक्तिमत्त्वाचा उलगडा करून त्यांच्या ग्रंथातील साहित्याचे गुणविशेष दाखवून दिले आहेत. ज्ञानदेवांच्या चरित्रातील अनेक गोष्टींबाबत इतिहासाने मौन स्वीकारल्यामुळे त्यांच्या वाङ्मयाच्या द्वाराच त्यांच्या अनन्यसाधारण व्यक्तिमत्त्वापर्यंत पोहचावे लागते, हे खरेच; पण त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या अलौकिकतेमध्येच त्यांच्या साहित्याच्या श्रेष्ठत्वाची कारणे सामावलेली आहेत. 'ज्ञानदेवांचे कवित्व संतत्वावर उभे आहे. संतत्व कवित्वाच्या आश्रयाने उभे आहे, असे म्हणता येणार नाही.' (पान २२) असा निष्कर्ष करंदीकर काढतात, तो कोणालाही पटेल असाच आहे. या प्रकरणात ज्ञानदेवांच्या व्यक्तिमत्त्वाच्या घडणीचा करंदीकरांनी काढलेला आलेख आणि त्याच्या आधाराने त्यांनी

घेतलेला ज्ञानेश्वरांच्या साहित्यगुणाचा परामर्श सर्वसामान्य वाचकाला उद्बोधक वाटेल असाच आहे. वाङ्मयाभ्यासकांना मात्र त्यात नवे असे काही नाही. तरीदेखील ज्ञानेश्वरांच्या लौकिक चरित्राबाबत त्यांनी उत्पन्न केलेले प्रश्न संशोधकांच्या दृष्टीनेही विचारार्ह आहेत, यात शंका नाही.

उपन्यासातील दुसऱ्या प्रकरणात (तीन रचना, तीन संवाद) करंदीकरांनी तीनही ग्रंथांचे साहित्यविशेष वर्णन करताना संवादाच्या अधिष्ठानावर ते कसे उभे आहेत, हे स्पष्ट केले आहे. ज्ञानदेवांच्या संवादशील व्यक्तिमत्त्वातून निघालेले श्रोतृसंवाद, मित्रसंवाद आणि आत्मसंवाद असे तीन प्रकारचे संवाद म्हणजे त्यांचे भावार्थदीपिका (ज्ञानेश्वरी), चांगदेवपासष्टी व अमृतानुभव हे तीन ग्रंथ होत, हा मुद्दा करंदीकरांनी विशद करून मांडला आहे. ज्ञानेश्वरीतील सारे वर्णन श्रोतृ-सापेक्ष किंवा लोकसापेक्ष आहे. तेथे ज्ञानदेव श्रोत्यांशी संवाद करतात. या ठिकाणी ‘ज्ञानेश्वरांचे श्रोतृसंवाद’ (ले.–प्रा. डॉ. द. भि. कुलकर्णी) या ग्रंथाची अभ्या-सकांना आठवण होणे स्वाभाविक आहे. चांगदेवपासष्टी हे ६५ ओव्यांचे छोटेसे प्रकरण पत्ररूप आहे. तेथे ज्ञानदेव समानशील योग्याशी (चांगदेवाशी) बरोबरीच्या नात्याने मित्रसंवाद करीत आहेत. ‘अनुभवामृताची रचना केवळ निर्निमित्त व स्वान्तःसुखाय झालेली आहे.’ (पान ३१) तेथे ज्ञानदेवांनी आत्मसंवाद साधला आहे. ‘आपल्याला भावणाऱ्या विशिष्ट अनुभवांसंबंधी आपले आपल्याशीच ते या ग्रंथात बोलत आहेत, हा ज्ञानदेवांचा मुक्त उद्‌गार आहे. यामध्ये गीता, श्रीकृष्ण, निवृत्तिनाथ किंवा शंकर या कोणाचा आधार घेऊन ज्ञानदेव बोलत नाहीत. ‘जे काही आहे ते सारे ज्ञानदेवांच्या अंतरंगातून उमटलेले आहे’ (पान ४४) स्वतः स्वतःशी केलेल्या संवादाचे हे प्रकट चिंतन आहे, म्हणून करंदीकर अमृतानुभवाला ‘ज्ञानदेवांचा आत्मसंवाद’ असे नाव देतात.

अमृतानुभव (किंवा अनुभवामृत) या ग्रंथाचा विषय मात्र ‘अद्वैताचा अनुभव’ हाच आहे. एका परीने ज्ञानेश्वरीतील प्रतिपाद्यच आत्मानुभवाच्या रंगाने रंगवून ज्ञानदेवांनी या स्वतंत्र ग्रंथामध्ये मांडले आहे. येथे गीतेतला कर्मयोग नाही किंवा नाथपंथी ‘कुंडलिनी योगा’ लाही येथे अवसर नाही. ‘तो (हठयोग) जाला इये मार्गी। दिहाचा चांदु ॥’ (अनु. ७२७) या शब्दात निस्तेज झालेल्या दिव-साच्या चंद्राची उपमा देऊन ज्ञानेश्वरांनी या ग्रंथात हठयोगाला अगदी बाजूला सारले आहे. तसेच, वैराग्य, इंद्रियसंयम अशा साधनांचेही विवेचन येथे नाही. बद्ध, मुमुक्षू, साधक या भूमिकांचाही येथे विचार केलेला नाही. अमृतानुभव हा केवळ सिद्धानुवाद आहे. ‘अद्वैत साक्षात्कारात पोचलेल्या पुरुषाचा अनुभव वर्णन करणारा हा ग्रंथ आहे.’ ज्ञानेश्वरांसारख्या सिद्ध पुरुषाने केलेला ‘आत्मसंवाद’ हेच त्याचे निखळ स्वरूप आहे. या भूमिकेने हा ग्रंथ पाहिला तरच अमृतानुभवाचे यथार्थ

अनुक्रमणिका

आकलन होऊ शकेल, हा विचार उपन्यासाच्या अखेरीला करंदीकरांना अभिप्रेत आहे.

या भूमिकेनेच 'आत्मसंवाद' या दुसऱ्या विभागातील सहा प्रकरणे (प्र. ३ ते ८. पाने ५३-२२८) त्यांनी लिहिली आहेत. शेवटी उपसंहाराच्या एकाच प्रकरणात अमृतानुभवातील तत्त्वज्ञान, त्यातील साहित्यविशेष आणि ज्ञानदेवांच्या व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार यासंबंधीचे निष्कर्ष त्यांनी संकलित केले आहेत... अमृतानुभवातील विशिष्ट ओवीचरणांचा उपयोग करून ३ ते ९ प्रकरणांना वैशिष्ट्यपूर्ण नावे दिली आहेत. उदा० 'रंभागर्भु आकाशें। निघाला जैसा '(प्र. ३) 'कां जे निकराचा आत्मभावो।' (प्र. ६) 'जाला देवोचि भक्तु।' (प्र. ८) ही नावे काव्यमय असून त्या त्या प्रकरणातील मुख्य आशयाच्या दृष्टीनेही समर्पक व सूचक आहेत. आशयाचा व्यवस्थित विचार करण्याच्या दृष्टीने करंदीकरांनी आत्मसंवादाची सहा प्रकरणांत विभागणी केली असली तरी शिवकल्याणांच्या 'नित्यानंदैक्यदीपिके' तील अमृतानुभवाची दहा प्रकरणांतील विभागणी करंदीकरांना कृत्रिम आणि विषम वाटते. उलट 'आठशे ओव्यांचा हा एक सलग ग्रंथ असावा' (पान १२७) या खुपेरकरप्रभृती पूर्वसूरींच्या मताशी करंदीकर सहमत दिसतात. मूळ अमृतानुभवातील ओव्यांचा क्रम कोठेही न सोडता त्यांनी या सहा प्रकरणी आत्मसंवादात अमृतानुभवातील प्रत्येक ओवीचा क्रमश: परामर्श घेतलेला दिसतो. त्या परामर्शात ओवीतील भावार्थाच्या विवरणावरोबर किंवा दृष्टांतांच्या स्पष्टीकरणावरोबर ओव्यांचा गद्य अनुवादही दिलेला आढळतो. सामान्य वाचकाच्या दृष्टीने अमृतानुभवाचे आकलन सुलभ नि सुबोध व्हावे या हेतूनेच हे ग्रंथलेखन केले आहे, त्याच्याशी ओव्यांचा अनुवाद देणे सुसंगतच ठरते. पण त्यामुळे मूळ ग्रंथाला अनुसरून बराच भाग पुनरावृत्त झाला असल्याने ग्रंथाची पृष्ठसंख्या वाढली आहे. त्याच त्याच विचारांची व कल्पनांची आवृत्ती करण्याचा मोह लेखकाला आवरता आलेला नाही. पुनरावृत्ती टाळून पुन्हा ग्रंथ लिहिला गेला तर पृष्ठसंख्या सहज निम्म्यावर आणता येईल, असे वाटते.

अनुवाद, अर्थविवरण, संपादन या स्वरूपात आजवर अनेकांनी अमृतानुभवावर लिहिले आहे. त्यांपैकी 'कोणत्याच ग्रंथाचा वा अनुवादाचा उपयोग न करता... आपण केवळ अमृतानुभवावरच लक्ष केंद्रित केले आहे,' हे लेखकाचे म्हणणे बहुतांशाने खरे आहे. परंतु अनुभवामृतासंबंधीचे सर्व ग्रंथ त्याने आत्मसात केल्याचा प्रत्यय या ग्रंथात अनेकदा येतो. पारंपरिक टीकापद्धतीचा कित्ता समोर ठेवून किंवा इतरांचे आधार घेऊन करंदीकरांनी प्रस्तुत ग्रंथाचे लेखन केलेले नाही, इतकाच त्यांच्या वरील विधानाचा अर्थ असावा. 'ज्ञानेश्वरीच्या अगोदर अमृतानुभवाची रचना झाली असावी' हे वा. ब. पटवर्धनांचे मत किंवा स्वतंत्र ग्रंथरचनेची प्रेरणा

निवृत्तिनाथांकडून कशी मिळाली यासंबंधी श्री. भय्यासाहेब किबे यांनी सांगितलेली आख्यायिका या दोहोंचा इन्कार सबळ युक्तिवादाने करंदीकर करतात. मंगलाचरणाच्या संस्कृत श्लोकांचा क्रम थोडासा बदलला तर ते ज्ञानदेवांच्या विशिष्ट तत्त्वज्ञानाशी सुसंगतच होईल, हे मत आणि ते विशिष्ट तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या मायावादी अद्वैतापेक्षा भिन्न आहे, हे सांगताना शं. दा. पेंडसे यांच्याशी केलेला प्रतिवाद; यासारख्या उदाहरणांवरून लेखकाच्या स्वतंत्र दृष्टिकोणाची झलक दिसून येते. तसेच, ब्रह्म-माया, प्रकृती-पुरुष यांतील संबंधापेक्षा ज्ञानेश्वरांच्या शिव-शक्ती वा देवो-देवी यांचे संबंध भिन्न प्रकारचे आहेत. किंबहुना अमृतानुभवातील सारे विवेचनच मुळी अगदी भिन्न पातळीवरून चालले आहे. या संदर्भातले ठिकठिकाणचे विवेचन पाहता शांकरमतापेक्षा चिद्विलासवादी अद्वैताच्या पक्षाकडे करंदीकर जास्त झुकलेले आहेत; हे स्पष्ट होते. त्या दृष्टीने 'जग असकी। वस्तु प्रभा' हे प्रस्तुत ग्रंथातले सातवे प्रकरण अमृतानुभवाच्या 'अज्ञानखंडन' या ७ व्या प्रकरणाप्रमाणे विशेष लक्षणीय असे उतरले आहे. 'ज्ञानदेव हे शंकराचार्यांप्रमाणे केवलाद्वैती नसून पूर्णाद्वैती आहेत,' हा सोनोपंत दांडेकरांचा निष्कर्ष आणि 'ज्ञानेश्वरांचा अद्वैतवाद चिद्विलासवादाच्या अंगाने पूर्णाद्वैताकडे जातो' हे भा. पं. बहिरटांचे प्रतिपादन या दोहोंशी जुळता असाच दृष्टिकोण करंदीकर स्वीकारतात, असे दिसते. या संदर्भात करंदीकरांनी काढलेले पुढील उद्‌गार मननीय आहेत. ते लिहितात–

"सार्‍या प्रणाली ज्ञानदेव जाणून आहेत. त्या सर्व विचारप्रणाली पचवून, त्यातील सत्वांश राखून जो सिद्धांत ते स्वीकारतात तो मन, बुद्धी, भावना, विचार एवढेच नव्हे, तर एकूण जाणिवांशी, त्याद्वारा प्राप्त होणाऱ्या अनुभवाशी एकरूप झालेला असतो. त्या अनुभवरूप जाणिवांचा आविष्कार अनुभवामृतामध्ये आढळतो. आग्रहाचे सूर उमटविणारे प्रतिपादन ते करीत नाहीत, किंवा खंडनमंडनाचा अभिनिवेशही त्यांच्या वाणीत उमटत नाही. 'हे समग्र विश्व म्हणजे त्या चिन्मात्रस्वरूप आत्मवस्तूचा विलास आहे, क्रीडा आहे.' हा स्वानुभवाधिष्ठित सिद्धान्त ज्ञानेश्वरांनी अमृतानुभवात मांडला आहे...तेव्हा असे वाटते की, विश्व हे त्या चिद्वस्तूचा जसा विलास आहे, तसा अनुभवामृत म्हणजे ज्ञानदेवांचा चिद्विलास आहे." (पाने १६१-१६२) ह्याच चालीवर पुढे बोलायचे झाले तर ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानासंबंधी डॉ. वि. रा. करंदीकरांना सर्वांगांनी जे जाणवले, त्या जाणिवांचा विलास (वा सहजाविष्कार) म्हणजे 'ज्ञानदेवांचा आत्मसंवाद' हा त्यांचा ग्रंथ, असे म्हणता येईल. इतकी समरसता करंदीकरांची अमृतानुभवाशी झालेली दिसून येते. हेच त्यांचे यश होय.

अमृतानुभवात अगदी पहिल्या ओवीपासून ते शेवटच्या ओवीपर्यंत अद्वैताचा

धागा धरून ठेवला आहे. प्रारंभीच्या शिव-शक्तीवंदनातही या युग्माच्या एकात्मतेवर भर दिला आहे. 'शिव-शक्ती या मिथुनाची रतिक्रीडा म्हणजेच विश्व' या कल्पनेचा विस्तार करताना ज्ञानेश्वरांकडून या दंपतीच्या शृंगारभावाचे वर्णन केले जाते, पण 'त्यामध्ये शारीरवासना चाळविण्याचा किंचितसाही धर्म नाही,' ही गोष्ट करंदीकर आवर्जून सांगतात. शिवाय 'या रूपकात्मक वर्णनाचा केवळ शृंगारिक अर्थ लावून त्याच्या आधाराने शाक्तादी पंथातील तशा कल्पनांचा प्रभाव ज्ञानदेवांवर पडला असावा, असा तर्क लढविणे अयोग्य आहे' असे ते म्हणतात. तसे करू पाहणाऱ्यांनी 'ज्ञानेश्वरांचे एकूण तत्त्वज्ञान व त्यांचे जीवितकार्य याचे सर्वांगीण भान ठेवावे,' (पान ६७) असा स्पष्ट इशाराही करंदीकर देतात.

गुरुवंदनाच्या प्रसंगातही ज्ञानेश्वर आपली नम्रपणाची भूमिका न सोडता गुरू व शिष्य या दोघांना अद्वैताच्या पातळीवर नेऊन ठेवतात. शिव-शक्ती, गुरु-शिष्य, भक्त-भगवंत, वंद्य-वंदिता, जीव-शिव या द्वंद्वात्मक गोष्टी मूलत: एकच असून त्यांच्यातील संबंधाचे पर्यवसानही अद्वैतातच कसे होते, हे दृष्टांतांच्या सहाय्याने ज्ञानेश्वर किती समर्थपणे व्यक्त करतात, हे स्पष्ट करताना 'गूळ-गोडी, कापूर-परिमळ, चंद्र-चांदणे, जल-तरंग, सुवर्ण-अलंकार' इत्यादी दृष्टांत पुन्हा पुन्हा येतात हा पुनरुक्तीचा दोष करंदीकर एकीकडे दाखवितात; पण 'अशा पुनरुक्त दृष्टांतांमुळेच अद्वैताचा अनुभव ठसठशीतपणे मनावर ठसतो.' (पान ७९) असे समर्थनही करतात. एकूण आठशे ओव्यांपैकी प्रारंभीच्या दीडशे ओव्या 'नमनाला घडाभर तेल' या म्हणीप्रमाणे नमस्क्रियारूप भागासाठी खर्ची पडल्या असल्या तरी 'हे वंदन केवळ औपचारिक राहत नाही. अखेरच्या अद्वैतानुभवाची बैठक सिद्ध करणारे ते आहे. शिव-शक्ती, गुरु-शिष्य यांची एकरूपता सच्चिदानंद स्वरूप आत्मवस्तूशी भिडणारी आहे.' (पान ८०) लेखकाने केलेले हे समर्थनही पटण्यासारखे आहे.

अमृतानुभवातील शब्दविवरणावर त्यांनी टाकलेला प्रकाशझोत असाच लक्षणीय आहे. (पाने १२१-१२२) 'वाणीचे ऋण फेडण्याचा उल्लेख हा ज्ञानेश्वरांचा एक विशेष आहे.' (पान ८१) असे करंदीकर सांगतात. 'गुरुपदेशाच्या शब्दांनीच आत्मज्ञान होते. त्यामुळे अध्यात्ममार्गावरील वाटचालीत शब्दांचे आपणावर काही ऋण आहे, असे ज्ञानेश्वरांसारख्या संवेदनशील पुरुषाला वाटणे साहजिक आहे. गुरूच्या उपदेशग्रहणाने 'जिती अविद्या' किंवा अन्यथाबोध (विपरीत ज्ञान) नाहीसा होणे, हेच शब्दऋण फेडणे होय. 'मेली अविद्या' (यथार्थ बोध) म्हणजेच स्वत:ला आत्मज्ञान झाल्याची जाणीव हीही बंधनकारक ठरते. त्यामुळे या सापेक्षज्ञानाच्या पलीकडील 'निखळ ज्ञानमात्र' अवस्थेला पोहोचल्यावर 'वाचांचे रिणशेष' ही 'पाया पडोनिया मियां। सोडविले ।।' (अनु. १७६)

असे ज्ञानेश्वर म्हणतात. त्याचा गर्भित अर्थ करंदीकरांनी चांगल्या प्रकारे उकलून दाखविला आहे. प्रथम शब्दांचे माहात्म्य वर्णन करून नंतर शब्दांचे विटेपणही ज्ञानेश्वरांच्या शब्दात करंदीकर स्पष्ट करतात. 'सत् चित् आनंद' ही तीन पदेही आत्मवस्तूच्या स्वरूप वर्णनाला कशी थिटी पडतात, हेही ज्ञानेश्वरांनी दिलेल्या दृष्टांतांच्या सहाय्याने समजावून देतात. त्याच वेळी दृष्टांतांचे सूक्ष्म नि तरल सौंदर्यही उकलून दाखवितात. करंदीकर लिहितात– "ज्ञान-अज्ञानाच्या अतीत असलेल्या 'ज्ञानमात्र' तेचे वर्णन वाचताना आपणच हरवून गेल्यासारखे वाटते. अतिशय तरल नि गहन असा आशय मनाला क्षणभर जाणवतो न जाणवतो एवढ्यात पुढच्या क्षणाला तो आपल्या आकलनातून निसटतो...जे इंद्रियांच्या पलीकडचे आहे, ते ऐंद्रिय संवेदनांच्या भाषेत ज्ञानदेव व्यक्त करतात, त्यामुळे घडणारी ही किमया आहे. संवेदनांची भाषा ही साहित्याची भाषा आहे. ती यांजल्यामुळे ज्ञान-देवांच्या आध्यात्मिक ग्रंथांनाही साहित्यकृतींचे रमणीयत्व प्राप्त होते." (आत्म. पान ९४)

प्रारंभी शब्दरूपात व्यक्त होणारी अद्वैतानुभूती द्रष्टादृश्य निरासानंतर निखळ वस्तुस्वरूपाचा अनुभव देणाऱ्या गूढ गहन प्रदेशात प्रवेश करते; तेव्हा शब्दांचे शब्दपण जणू हरपून जाते. स्वरूप निर्धार करताना परावाणीसह वैखरी नाहीशी होते. ती 'मौनातें म्हणे मौन करी' या भाषेत शब्दखंडन करून ज्ञानेश्वर 'अविद्या खंडन (प्र. ५) करू लागतात. तेथून ते अज्ञान खंडनाकडे, मग ज्ञान खंडनाकडे कसे वळतात ते करंदीकरांनी चढत्या क्रमाने वर्णन केले आहे; 'आत्म-वस्तूच्या ठायी ज्ञान-अज्ञान दोन्हीही मिथ्याच होत.' (पान १३५) या मुद्द्याचे प्रतिपादन करताना प्रत्यक्ष व अनुमान प्रमाणांचा आधार घेऊन ज्ञानेश्वर तार्किक युक्तिवादही समर्थपणे कसा करतात, हे उदाहरणे देऊन करंदीकर स्पष्ट करतात. "तर्काचा इतका सुस्पष्ट अवलंब केल्याचे अज्ञानविषयक विवेचन हे एकच विशेष उदाहरण म्हणावे लागेल," असा याबाबत करंदीकरांचा अभिप्राय दिसतो, तो योग्यच आहे. ज्ञानेश्वरांसारख्या संतांनी इतर प्रमाणांपेक्षा उपमान प्रमाणावरच आपली भिस्त ठेवल्याने त्यांच्या अभिव्यक्तीमध्ये उपमादृष्टांतांची व रूपकांची गर्दी दिसते.

अमृतानुभवातील महत्त्वाचे सिद्धान्त करंदीकरांनी ज्ञानेश्वरांच्या शब्दांतच पण अधिक सुबोध करून समजावून दिले आहेत. अमूर्त विषयासंबंधीच्या गहन सिद्धान्तांचे त्यांनी केलेले सुबोध स्पष्टीकरण खरोखरच उल्लेखनीय आहे. अशा वेळी उपनिषदे, महाकाव्ये, कालिदासासारख्या श्रेष्ठ कवीच्या उक्ती, रामकृष्ण परम-हंसांचे उद्‌गार इत्यादींमधील समान स्थळांचाही ते निर्देश करतात. त्यामधून त्यांच्या व्यासंगशीलतेचा प्रत्यय येतो. पण पांडित्याचा नसता डौल मात्र जाणवत नाही.

अनुक्रमणिका

'कां जे निकराचा आत्मभावो ।' (प्र. ६) आणि 'म्हणौनि जग असकी वस्तुप्रभा' (प्र. ७) या दोन प्रकरणांतील सुबोध नि स्पष्ट विवेचनावरून त्यांच्यातील यशस्वी शिक्षकाची सहज ओळख पटते. त्या दृष्टीने 'योगनिद्रा' या शब्दाऐवजी विशिष्ट क्षणातील वस्तूच्या स्वरूपावस्थेला ज्ञानेश्वरांनी दिलेली 'योगभूमिका' (म्हणजेच 'निकराचा आत्मभाव') ही संज्ञा कशी योग्य आहे, यासंबंधीचे करंदीकरांचे विवेचन पाहावे. (पाने १६९-१७२) त्यांच्या सूक्ष्म टीकादृष्टीची व चिकित्सक वृत्तीची त्यावरून खात्री पटते. 'म्हणौनि जग असकी । वस्तुप्रभा ।।' या प्रकरणात तर आतापर्यंतच्या सर्व विवेचनाचे सार करंदीकरांनी संकलित केले आहे. या एका प्रकरणाच्या वाचनाने सर्व ग्रंथ समजल्याचे श्रेय मिळण्यासारखे आहे.

आत्मसंवादातील प्रत्येक प्रकरणात त्या त्या ठिकाणच्या दृष्टांतांचे मर्म तौलनिक बुद्धीने उकलून दाखविण्यावर करंदीकरांनी विशेष भर दिला आहे. आशयाच्या एकतेमुळे तेच तेच दृष्टांत मूळ ग्रंथकाराला द्यावे लागल्यामुळे करंदीकरांनाही पुनरुक्तीचा दोष पत्करावा लागला आहे. बहुतेक सर्व ठिकाणी दृष्टान्ताचा गद्य अनुवाद केला असून त्याची समर्पकता पटवून देण्याचा फार बारकाईने प्रयत्न केला आहे. त्यामुळे त्यांचा प्रस्तुत ग्रंथही मूळ ग्रंथाप्रमाणे रोचक झाला आहे. ज्ञानेश्वरांची आध्यात्मिकता व सौंदर्यवृत्ती यातील अनुबंध स्पष्ट करताना उपसंहारात करंदीकर लिहितात—

"ऐहिकाला विन्मुख असलेल्या या विरक्त पुरुषाच्या ठिकाणी वैराग्य जेवढे प्रखर आहे तेवढेच सौंदर्यविषयक भान जागे आहे. इंद्रियातीताच्या जाणिवेने अधिक उन्नत आणि उदात्त बनले आहे." डॉ. करंदीकरांच्या मताने 'ज्ञानदेवांच्या सर्वस्पर्शी रसिकतेचे सामर्थ्य त्यांच्या आध्यात्मिक धारणेत आहे, म्हणून उपनिषदांच्या आर्ष उद्‌गारातील उत्स्फूर्तता आणि महाकाव्यरचनेतील अभिजात सहजता यांचा मनोज्ञ संगम अमृतानुभवामध्ये दृष्टीस पडतो."

अनुभवामृतातील स्वतंत्र विचाराच्या पाऊलखुणा ज्ञानेश्वरीतही कशा आढळतात, हे करंदीकरांनी उपसंहाराच्या प्रकरणात उदाहरणे देऊन स्पष्ट केले आहे. ज्ञानेश्वरीच्या ९ व्या अध्यायातील 'जग निखिल माझेंचि वोतले ।' (९.३०२) यासारख्या उद्‌गारात 'जग असकी वस्तुप्रभा ।' या उद्‌गारातील सिद्धांताचा सूक्ष्म आविष्कार आढळतो. तसेच, ज्ञानेश्वरीच्या पंधराव्या अध्यायातील उत्तम पुरुषवर्णन व १८ व्या अध्यायातील 'पराभक्ती' चे विवेचन यामधे अमृतानुभवाची परिभाषा कशी आढळते, ते स्पष्ट करताना करंदीकर लिहितात— "ज्ञानेश्वरीच्या उत्तरार्धात अमृतानुभवातील विषयाची चाहूल लागते. ज्ञानदेवांना आपले असे जे काही मांडता येण्यासारखे आहे ते हळूहळू प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे येत राहिलेले आहे. पण त्याला (ज्ञानेश्वरीत) पुरेसा अवसर मिळालेला नाही. (पान २३४)... गीता टीकेच्या

अनुक्रमणिका

निमित्ताने केलेला श्रोतृसंवाद संपल्यानंतर स्वतःशीच साधलेल्या आत्मसंवादात (अमृतानुभव या स्वतंत्र ग्रंथात) ज्ञानेश्वरांचा चिद्विलासवादी अद्वैताचा सिद्धांत स्वतंत्रपणे प्रकट झाला आहे...जीवनाला व्यापून राहणारी त्यांची आत्मनिष्ठा किंवा स्वतःच्या जाणिवांशी असणारे त्यांचे इमान यामुळे त्यांनी वर्णन केलेल्या निर्द्वंद्वावस्थेतील अनुभवाच्या दर्शनाने आपल्या जाणिवांचे विश्व उन्नत होते. त्याचे श्रेय ज्ञानदेवांच्या शब्दातील आशयाला जितके आहे, तितकेच त्यांच्या परमरमणीय अशा अभिव्यक्तीलाही दिले पाहिजे..." (पान २४२)

अमृतानुभवावरील शिवकल्याणांच्या 'नित्यानंदैक्यदीपिका' या टीकेचा वाङ्मयेतिहास खंड २– भाग १ मधील आपल्या लेखात परिचय करून देताना 'मुळात गहन असलेला अद्वैतानुभव हा विषय शक्य तितका सुलभ व स्पष्ट करून सांगणे हा शिवकल्याणांचा हेतू आहे आणि त्यात त्यांना यश लाभलेले आहे.' (म. वा. इ. खंड २– भाग १, पान २१०) असे मत करंदीकर व्यक्त करतात. त्यांच्या 'ज्ञानेश्वरांचा आत्मसंवाद' या ग्रंथाबद्दलही आपणास असेच म्हणता येईल. ज्ञानेश्वरांचा 'अमृतानुभव' गद्यरूपात सुलभतेने स्पष्ट करून सांगणे, हाच हेतू करंदीकरांनी डोळ्यांपुढे ठेवला असून त्यात ते चांगलेच यशस्वी झाले आहेत. 'मूळ ग्रंथाला पुरा न्याय देण्या' बाबत मध्ययुगातील शिवकल्याणांचा टीका ग्रंथ व वर्तमानकाळातील श्री. करंदीकरांचा प्रस्तुत ग्रंथ दोन्हीही तुल्यबल ठरतील, असे वाटते. चिकित्सक दृष्टीने पण सहृदयतेने करंदीकरांनी अमृतानुभवाचे सर्वांगीण अवलोकन केल्यामुळे प्रस्तुत ग्रंथही शिवकल्याणांच्या ग्रंथाइतकाच परिपूर्ण व दर्जेदार झाला आहे. सारे विश्व व आत्मतत्त्व ह्याबद्दल ज्ञानदेवांना 'जे स्वतःला भावले व ते जसे भावले तसे ज्ञानदेवांनी येथे (अमृतानुभवात) व्यक्त केले आहे.' (पान ४४) असे करंदीकर अमृतानुभवाबद्दल सांगतात. करंदीकरांच्या आत्मसंवादाबद्दलही असेच उद्गार काढता येतील, कारण हे अवलोकन करताना लेखकाने केवळ पांडित्यप्रदर्शक टीकाकाराची दृष्टी ठेवली नसून अमृतानुभवाचे मर्मग्रहण रसिकतेने करू पाहणाऱ्या जिज्ञासू आस्वादकाची भूमिका त्यांनी घेतली आहे. ज्ञानदेव व त्यांची ग्रंथसंपदा या संबंधीचे त्यांचे हे प्रकट चिंतन श्री. करंदीकरांनी अमृतानुभवाच्या संदर्भात स्वतः-शीच केलेला हा 'आत्मसंवाद' प्रारंभी व्याख्यानरूपाने कौशिक व्याख्यानमालेच्या श्रोत्यांपुढे व आता ग्रंथरूपाने वाचकांपुढे ठेवला आहे. त्याच्या मदतीने कोणालाही अमृतानुभवाचे रहस्य सहजपणे समजून घेता येणार आहे, एवढी उद्‌बोधकता आणि रोचकता या आत्मसंवादात आहे खास !

(ज्ञानदेवांचा आत्मसंवाद : वि. रा. करंदीकर, कॉन्टिनेण्टल प्रकाशन पुणे–३०. किंमत ५० रुपये.)

# 'वादळडोळा' : एक लक्षणीय कादंबरी

## मनोहर शहाणे

सौ. जयश्री खिरे यांची 'वादळडोळा' कादंबरी मी वाचून संपवली, तरी ती कादंबरी भावनिक स्पंदनांच्या संदर्भात काही संपली नाही. कादंबरी संपली नाही म्हणजे त्यांनी कादंबरीत रंगविलेला 'पपा' काही मनातून उठून गेला नाही. प्रवास करणारी बस एखाद्या गावात थांबावी, एखादी परिणामकारक व्यक्ती गावी उतरावी, त्याप्रमाणे 'पपा' माझ्याकडे मुक्कामाला आला आणि पुस्तक दूर निघून गेले.

ख्रिश्चन धर्म स्वीकारलेल्या एका विद्वान, शुद्ध ब्राह्मणाचा मुलगा 'पपा', त्याची मुलगी कल्पना, तिचे विश्वास केतकर नावाच्या ब्राह्मणावर असलेले प्रेम. आपले प्रेम सफल होईल की नाही, ही शंका आल्याने त्यांचे गुपचूप पलायन.

या सर्व घटनाचक्रातून 'पपा' आपल्या नजरेसमोर येतो. त्याचे लौकिक जीवनही विलक्षण आहे. वनखात्यात नोकरी. रानावनात राहणे, झाडापेडांची संगत, निसर्गाचा एकान्तवास, मनुष्यवस्तीपासून दूर आणि त्याचा वेगळा छंद, नदीच्या पोटातल्या, डोंगराच्या कडेकपारीच्या लुप्त झालेल्या मूर्ती शोधणे. त्या भंगलेल्या, उपेक्षित, काळाच्या पडद्याआड गेलेल्या मूर्तींना तो जवळ करतो. त्या मूर्ती म्हणजे प्राचीन शिल्पकारांना पडलेली शिल्पस्वप्नं. त्यांच्या साहाय्याने पपा आपले आजचे आयुष्य सुसह्य करतो.

ही सर्व कादंबरी मला 'पपा' ची वाटते. लेखिकेने ही व्यक्तिरेखा इतकी छान रंगविली आहे की, पपा व्यक्त होऊन जेवढे पदर उलगडतो, त्यापेक्षा कितीतरी जास्त थरांचे सूचन तो अव्यक्त राहून करतो.

ही कलात्मकता कादंबरीच्या अखेरपर्यंत टिकून राहते.

ख्रिश्चन 'पपा' ची मुलगी कल्पना ब्राह्मण विश्रामबरोबर पळून जाते, ख्रिश्चन वस्तीतले ख्रिश्चन दादा लोक त्याच्याकडे येऊन त्याला धमकावून जातात. तेव्हा त्यांना तो म्हणतो, "जास्तीत जास्त काय करणार रे तुम्ही? माझ्या घराची राखरांगोळी ? खुशाल करा."

ते लोक निघून जातात. 'पपा' ला भास होतो. ही रात्रीची वेळ असते त्याचे वडील शंकर भट ख्रिश्चन फादरकडे, आपण धर्मांतर केले खरे पण नव्या धर्माचे लोक आपल्याला छळतात, हे सांगण्यासाठी चालले आहेत. त्यांना 'पपा

अनुक्रमणिका

म्हणतो–" अहो शंकरभट, थांबा. फादरकडे चाललात का ? तुमच्या रुक्मिणीला (शंकरभटाची वायको, ' पपा ' ची आई) खूप त्रास होतोय असं सांगायला ? तर मग माझेही एक काम करा. माझ्या मुलीविषयी– कल्पूविषयी– सांगा त्यांना. हे वस्तीतले लोक तिच्या जीवावर उठलेत हो ! तुम्ही फादरला सांगा की– तुम्ही ख्रिश्चन धर्मात उभे राहू नका– धर्मापलीकडे उभे राहा. आणि मग या (बहिष्कृत) माणसांना जवळ घ्या."

' पपा ' च्या रूपात मला ' मोठा ' माणूस प्रगटलेला दिसतो.

कादंबरीच्या नावाप्रमाणेच कथानक, त्याची मांडणी, त्यातील व्यक्तिरेखा सारे काही आगळेवेगळे आहे.

(वादळडोळा : सौ. जयश्री खिरे, सुपर्ण प्रकाशन, पुणे, ३० रु.)

* * *

## साभार स्वीकार

### लेख, भाषणे इत्यादी

**महामानव डॉ. आंबेडकर** : संपादित; चेतश्री प्रकाशन, अमळनेर. १९८८ रु. ५.

**एका फांदीचे पक्षी** : डॉ. मधुकर आष्टीकर; मेधा प्रकाशन, नागपूर; १९८५. रु. ३०.

**विडा घ्या हो नारायणा** : डॉ. मधुकर आष्टीकर; मेधा प्रकाशन, नागपूर; १९८६ रु. ३०.

### कथा

**कुंकवाचं देणं-घेणं** : जयश्री खरोटे; चेतश्री प्रकाशन, अमळनेर, १९८८ रु. २५.

**तथास्तु** : हरिहर आठलेकर; चिंतामणी साहित्य सहयोग प्रका. संस्था, कुडाळ; १९८७ रु. ३०.

**खाकी वर्दी** : द. सा. साळगावकर; चिंतामणी साहित्य सहयोग प्रकाशन संस्था, कुडाळ; १९८८ रु. ३०.

**रोंवाट** : प्र. श्री. नेरुरकर; चिंतामणी साहित्य सहयोग प्रका. संस्था, कुडाळ; १९८८ रु. ४५.

अनुक्रमणिका

# तारतम्य : अभ्यासपूर्ण परखड शोधलेख

## म. श्री. दीक्षित

डॉ. स. गं. मालशे यांच्या 'तारतम्य' मधील पंधरा लेखांचे स्वरूप संशोधनात्मक, तसेच समीक्षणात्मक आहे. संशोधनात्मक लेखन सामान्यत: रूक्ष असते. पण हे लेखन याला अपवाद आहे. डॉ. मालशे प्राचीन आणि अर्वाचीन वाङमयाचे रसिक अभ्यासक आहेत. जुन्यातले अस्सल ते नव्या रूपात खुलवून सांगतात. साधार, परखड पण वाचनीय शोधलेख कसे लिहावेत याचा वस्तुपाठ म्हणजे हे लेख.

लोकहितवादी, म. फुले, चिपळूणकर, न्या. रानडे, टिळक-आगरकर, पंडिता रमाबाई इ. अनेक कृतिशील विचारवंतांमुळे गेल्या शतकात महाराष्ट्र ढवळून निघाला. धर्मचिकित्सा, स्त्रीशूद्रादिकांचे शिक्षण नि उद्धार, धर्मप्रसार, आचार-विचारांमधील विसंगती, असे अनेक विषय अभिनिवेशाने त्या वेळी चर्चिले गेले. वादांच्या या गदारोळात मूळ सत्य बाजूला पडून विलक्षण ताणतणाव उत्पन्न होत गेले. म. फुले, लोकहितवादी आणि पं. रमाबाई यांच्या उक्ती आणि कृती एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात विशेष वादग्रस्त ठरल्या. 'तारतम्य'मधील तीन-चतुर्थांश लेखन या तीन व्यक्तींसंबंधी आहे. त्याच्या वाचनाने आपले समज-अपसमज तपासून घेण्यास जशी मदत होईल, तसेच काही दुर्लक्षित विषयांकडे नव्याने लक्ष जाईल. तळटीपा, साधनसूची, व्यक्तिनामसूची इ. उपयुक्त मजकुरांची जोडणी दिल्याने प्रियोळकर परंपरेतील साक्षेपी वाङमयसंशोधकाची भूमिका मालशे उत्तम प्रकारे पार पाडतात.

'शेतकऱ्याचा आसूड' या म. फुले यांच्या पुस्तकाच्या लेखनाचा आणि प्रकाशनाचा शोधपूर्वक मागोवा घेऊन त्याच्या स्वरूपाचे विवरण पहिल्या लेखात केले आहे. दुसऱ्या लेखात फुले यांच्या शैक्षणिक कार्याची प्रेरणा नेमकी कोणापासून मिळाली, पत्नीचा आणि ब्राह्मण सहकार्यांचा या कार्यात सहभाग किती होता, या दुर्लक्षित गोष्टी मालशे यांनी सांगितल्या आहेत. ख्रिस्तीधर्म आणि मिशनरी यांचा फुले यांच्या आचारविचारांवर जो प्रभाव पडला, त्याचा ऊहापोह तिसऱ्या लेखात तारतम्यबुद्धीने केला आहे. फुले यांच्या भाषाशैलीचा अभ्यासपूर्ण, रसोद्ग्राही परिचय करून देणारा लेख हा या संग्रहातील सर्वोत्कृष्ट लेख म्हणावा लागेल. पुनरुक्ती आणि एकसुरीपणा हे दोन दोष जमेस धरूनही फुल्यांच्या शैलीचे झणझणीत मराठमोळेपण डॉ. मालशे यांनी विशद केले आहे.

अनुक्रमणिका

म. फुले यांच्या नावावर 'मराठी भाषेवरील एक पोवाडा' असल्याची समजूत आहे. अंतर्गत पुराव्यावरून ही समजूत कशी निराधार ठरते याचे विश्लेषणही एका लेखात वाचायला मिळते. प्रा. माळीकृत सावित्रीबाई फुले यांच्या चरित्राची अनैतिहासिकता सहाव्या प्रदीर्घ लेखात डॉ. मालशे यांनी सत्यान्वेषक बुद्धीने, परंतु थोडया आक्रमक भूमिकेतून दाखवली आहे.

'स्त्री-पुरुष तुलना' या १८८२ मधील ताराबाई शिंदे यांच्या पुस्तकाची अपूर्वाई सांगताना विचार आणि शैली या दोन बाबतींत फुले यांच्याशी नाते जोडणारे हे सामाजिक पुस्तक पं. रमाबाई किंवा काशीबाई कानिटकर यांच्या आधी विदर्भातील एक मराठा स्त्री लिहिते याचा सार्थ अभिमान मालशे व्यक्त करतात. म. फुले यांच्या आचारविचारांचे आस्थेवाईकपणे आणि चिकित्सकबुद्धीने दर्शन घडविणारे हे सातही लेख उद्बोधक आहेत, विचारोन्मुख करणारे आहेत.

लोकहितवादींचे पुरोगामी लेखन आणि उत्तर आयुष्यातील प्रत्यक्ष वर्तन हा गेल्या काही वर्षांत वादग्रस्त होऊन बसलेला विषय आहे. डॉ. मालशे यांचे यासंबंधात दोन लेख आहेत आणि इतर दोन वाङ्मयसमीक्षात्मक शोधनिबंध आहेत. पहिला लेख 'बुद्धिप्रकाश' या गुजराती नियतकालिकातील लोकहितवादींच्या लेखनाचा सविस्तर परिचय डॉ. अरुण जोशी यांच्या पुस्तकाच्या निमित्ताने घडविलेला आहे. त्या पुस्तकातील त्रुटी सप्रमाण दर्शविल्या आहेत. 'जातिभेद' या लोकहितवादींच्या पुस्तिकेचा परामर्श घेताना त्यांच्या वर्तनातील विसंगतीवर लेखकाने प्रकाश टाकला आहे. 'गोपाळराव हरी' या डॉ. सरोजिनी वैद्य यांच्या पुस्तकाचे परीक्षण करतानाही या विसंगतीकडे लक्ष वेधले आहे. 'मिया मूठभर दाढी हातभर' असा काहीसा कठोर शेरा प्रस्तुत पुस्तकाबाबत मारला गेला आहे. लोकहितवादींचे म्हणून समजले जाणारे 'एक स्वदेशहितेच्छू' पुस्तक त्यांचे नसून विष्णुशास्त्री पंडितांचे असले पाहिजे, असे ठासून सांगणारा निबंध पुस्तकातील सर्वांत छोटा, पण खळबळजनक आहे.

दे. ना. टिळककृत 'पंडिता रमाबाई' या मराठीतील विस्तृत चरित्राचा परामर्श घेताना वाङ्मयप्रकार या दृष्टीने चिकित्सा करून त्यातील उणिवांकडे लक्ष वेधिले आहे. ख्रिस्तीधर्मप्रसाराच्या दृष्टीमुळे प्रस्तुत चरित्राला नि चरित्रविषयाला वैगुण्य प्राप्त झाले आहे, हे त्यांनी साधार दाखविले आहे. कादंबरीकार हरिभाऊ आपटे यांचे समीक्षालेखन कसे सकस होते, विशेषत: शेक्सपियरच्या नाटकांचा त्यांचा अभ्यास कसा खोल, सूक्ष्म होता याविषयीचा लेख हरिभाऊंचे एक नवे दर्शन घडवील यात शंका नाही. बेळगावचे कृ. बा. मराठे यांनी 'मराठी रंगभूमीचा पूर्वरंग' या पुस्तकात संगीत रंगभूमीचा उदय बेळगावी १८७५ साली सं. शाकुंतलाच्या प्रयोगाने झाला असे प्रमेय मांडून रूढ समजुतीला धक्का दिला होता. ते

प्रमेय निराधार असून ३१ ऑक्टोबर १८८० रोजी पुण्यात संगीत रंगभूमीला आरंभ झाला, असे मत डॉ. मालशे मांडतात. 'संगीत हजामत' हा पुस्तकातील संहितायुक्त लेख डॉ. मालशे यांच्यातील संशोधकवृद्धी आणि रसिक विनोदवृद्धी यांची साक्ष देतो. जुन्या नाटकातील अतिरिक्त पद्यरचनेचे पद्यरूपातच हास्यकारक विडंबन केल्याने हा लेख रंजक ठरतो. डॉ. माळी, डॉ. सरोजिनी वैद्य आणि कृ. वा. मराठे यांच्या लेखनाचा परामर्श घेताना डॉ. मालशे यांनी थोडी कडक हजेरी घेतल्याचे मात्र जाणवते.

अनवधानाने राहून गेलेल्या काही चुका टाळता आल्या असत्या. उदा. 'जोतिराव' ऐवजी 'ज्योतिराव' असा चारपाच ठिकाणी उल्लेख. हंटरकमिशनपुढील निवेदनाचा सन १८८२ ऐवजी १८७२ असा चुकीचा पडला आहे. (पृ. १६,) सत्यशोधक समाजाची स्थापना २४ सप्टेंबर १८७३ ऐवजी 'नोव्हेंबरमध्ये' असे दिले आहे. (पृ. २०), शारदासदनाचे पुण्याहून केडगावी स्थलांतर १८९३ ऐवजी १८९८ (पृ. १२४), 'सं. हजामत' मधील विडंबनाच्या पदांच्या संख्येतील तफावत (पृ. १७१ व १७४). या चुका किरकोळ आहेत. पण अधिकारी संशोधकांच्या पुस्तकांत त्या असल्याने त्यांची पुनरावृत्ती होण्याचा धोका. एकोणिसाव्या शतकाच्या वाङ्मयीन आणि सामाजिक चळवळींच्या अभ्यासकांना खचित उपयुक्त ठरेल, असे हे पुस्तक आहे. महाराष्ट्र टाइम्सचे संपादक गोविंद तळवलकर यांची छोटी पण मार्मिक प्रस्तावना पुस्तकाला लाभली आहे.

(**तारतम्य** : स. गं. मालशे, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई व पुणे : पृष्ठे १९०, मूल्य ५० रु.)

* * *

## साभार स्वीकार

### चरित्रे, आठवणी

**पहाटतारे** : दादा धर्माधिकारी! चेतश्री प्रकाशन, अमळनेर; १९८८ रु. ५०

**बदलते जीवन** : इंदुमती सुखात्मे; श्रीविद्या प्रकाशन, पुणे ३०. १९८८ रु. ४५.

**आठवणीत राहिलेली माणसे** : एस. डी. काळे; काळे सत्कार समिती, समर्थ सदन, पंचपाळे हौद, सातारा, पृष्ठे १४४ रु. २०.

अनुक्रमणिका

# बेरड समाजाचे भेदक चित्र

## सौ. मालती देऊळगावकर

भीमराव गस्ती यांचे 'बेरड' हे आत्मकथन. १९८१ पासून अनेक आत्मकथने प्रकाशित झाली. 'आत्मकथेची ती एक लाटच आली' असे गस्ती 'मनोगता'त म्हणतात. आत्मकथने लिहून एखाद्या जमातीचे प्रश्न सुटतील यावर त्यांचा विश्वास नाही. त्यापेक्षा चळवळीला वेळ दिला तर काही प्रबोधन होऊ शकते, असा त्यांचा दावा आहे. तथापि बाहेरच्या लोकांना बेरडांची परिस्थिती समजण्यासाठी लिहिले पाहिजे, हा एक विचार पटल्यामुळे गस्ती यांनी हे पुस्तक लिहिले. हे पुस्तक लिहिताना जमातीच्या समस्यांनाच महत्त्व द्यायचे, स्वतःविषयी थोडेच लिहायचे, असा त्यांचा बेत होता.

'रम्य ते बालपण!' हे सुखवस्तू लोकांचे आवडते व भूतकाळात रमण्याचे ठराविक गृहीतकृत्य. गस्तींना मात्र भूतकाळ म्हणजे पायात खोलवर रुतलेला बाभळीचा काटा वाटतो. मनात ठसठसणाऱ्या, पू धरलेल्या काट्यासारख्या या आठवणी क्लेशकारक वाटतात.

शासनाने आवश्यक केल्यामुळे अनेक मुले शाळेत जाऊ लागली. भीमरावही त्यांतलाच एक. शाळा चुकवली तर इतर मुले प्रेतासारखी उचलबांगडी करून शाळेत घेऊन जात. मास्तर 'आंघोळ करून या' सांगत. मग तीन-चार मुले डोहात पोहण्यासाठी जात. ओढ्याजवळील चिंचेच्या झाडाच्या चिंचा पळवीत. कुळवाड्याने डोहात बाभळीचे काटे आणून टाकले. मुलांनी उड्या मारल्या तशा त्यांच्या उघड्या अंगात हे काटे खचाखच घुसले. एक काटा लेखकाच्या पायात आरपार घुसला. 'हे रुतलेले काटे अजूनही सलतात' असे लेखक म्हणतो. सलणाऱ्या काट्यासारखे हे बालपण सुखाचे कसे वाटणार?

बापाने दारूबंदीच्या काळात चोरून हातभट्टीची दारू विकली. तर पोलिसांनी 'भरमाप्पा' दाखवला. पुढे रखवालदाराचे काम मिळाले तेव्हा रोजची हजेरी चुकली म्हणून मोठे भूषण वाटले.

बेरड वस्तीतील सर्व पुरुषांना गावच्या पोलिस पाटलाकडे सकाळ-संध्याकाळ हजेरी लावावी लागे. बेरड ही गुन्हेगार जमात हे जन्मानेच ठरलेले असे. हजेरी चुकवली की पोलिसांकडून वाटेल तसा मार-- 'भरमाप्पा' मिळे.

बेरड जमातीमधील सण, उत्सव, अंधश्रद्धा, अंत्यविधी यांचे वर्णन यात आले

अनुक्रमणिका

आहे. त्यामुळे त्या समाजजीवनाचे दर्शन घडते. होळीचा रंग तर खेळायचा. पण रंग आणण्यास पैसे कुठले? मग उफळीच्या झाडाच्या फुलापासून रंग तयार करायचा. गडद रंग व्हावा म्हणून चुन्याऐवजी चिमणीची विष्ठा मिसळायची.' कामण्णा ' उभा करायचा व पूर्वीचे वैर असेल तर ' कामण्णा ' च्या मालकीवरून खूनही पाडायचे. ससा, बैल, रेडा कापून मस्त जेवायचे, गाणी म्हणायची. कामण्णा तोडल्यावर ज्या दिशेस पडेल त्या दिशेस पाऊस चांगला पडणार असा त्यांचा समज. लग्नात ' ईर ' काढायचा, बकरी कापायची. ईर संचारलेल्या माणसामागे अिरदेवाकडे जाऊन (शेतात) नैवेद्य दाखवायचा. लेखकाच्या लग्नात ईरदेवाचा नैवेद्य पितळेच्या व तांब्याच्या विनकल्हईच्या भांड्यात शिजवला. जेवणानंतर सर्वांना उलट्या होऊ लागल्या. तेव्हा विनकल्हईच्या भांड्यामुळे विषबाधा झाली हे सांगूनही कोणास पटेना. ' ईरदेव कडक असतो. त्याच्या पूजेत काहीतरी चूक झाली म्हणून असे घडले ' हाच ठाम विश्वास. ईरदेवच यातून तारणार हीच श्रद्धा. अंधश्रद्धेची अनेक उदाहरणे यात येतात. जन्मतः पायाने अधू असलेल्या लेखकाच्या बहिणीस, ' यल्लमास ' नेऊन परशुरामाशी तिचे लग्न लावले. पाय तर बरे झालेच नाहीत, जन्माची परवड झाली. पण पूजेतच काहीतरी चुकले म्हणून पाय बरे झाले नाहीत ही भावना कायम. त्यामुळे विश्वासास तडे बसत नाहीत.

सौदत्तीच्या यल्लमाच्या जत्रेत अनेक मुलींबरोबर सत्यवा या लेखकाच्या मेहुणीस यल्लमास वाहिले. परशुरामाशी लग्न झाल्यामुळे पुन्हा लग्नाचा प्रश्नच नाही. घरगड्याच्या घरीच ती राह्यची. त्याला ' उडकी ' करणे म्हणतात. पण पुढे तो घरगडीही तिच्याकडे संशयाने पाहायचा; तर गावातील लोक ' जोगतीण ' म्हणजे गावाची बायको, पैसे मोजले की हक्क या दृष्टीने पाहायचे. मूल झाल्यावर घरगड्याने थयथयाट केला. या संशयातून व छळातून तिला वेड लागले. ' मिया जोगतीन. तू माझा नवरा. गावचे सगळे माझे नवरे ' असे ओरडत ती हिंडू लागली. लोक दगड मारू लागले. व एक दिवस तिचे प्रेत विहिरीत सापडले. सत्यवाचा शेवट वाचकास चटका लावून जातो.

यल्लमा आई. परशुराम तिचा मुलगा. मग भावाबरोबर बहिणींचे लग्न कसे? एकाच वेळी अनेक मुलींशी लग्न कसे? हे प्रश्न लेखकाने आईस विचारले तर ' देवी कडक हाये. तिला तसं विचारलेलं आवडत नाय. शिकशान शिकलास म्हणून लै शाना झालास व्हय?' असे उत्तर मिळे.

भीमराव गस्तीचा अबोल, भिडस्त स्वभाव. शिकत असताना इतर मुले खोड्या करीत व आळ भीमरावावर घेत. आपली बाजू खरी असतानाही ती मांडण्याचे धैर्य नसल्याने ही माणसे कणाहीन व लाचारीने जगतात. त्यातून बेरड ही गुन्हेगार जमात म्हणून दिलेल्या वागणुकीतून न्यूनगंडाची भावना वाढतच राही.

अनुक्रमणिका

पण शिवाजी महाराजांच्या व पेशवाईच्या काळातील पराक्रमी, इमानी व स्वामिभक्त 'वेडर' रामोशांच्या इतिहासाने जातीबद्दल अभिमान वाटू लागला.

'लगमण्णां'च्या मृत्यूनंतर तर पोलिसांचा छळ बेरड जातीसच का हा प्रश्न मनात घर करून राहिला व या अत्याचाराविरुद्ध आवाज उठविण्याचे बीज रोवले गेले.

आत्मकथनाच्या दुसऱ्या भागात बेरडांची संघटना तयार करून त्यांना न्याय मिळण्यासाठी दिलेला झगडा प्रामुख्याने आला आहे. शिक्षण संपल्यानंतर नोकरीच्या शोधात असतानाच गावातील जमिनी अल्प किमतीत एका कारखान्यासाठी घेतल्या गेल्या. गावकऱ्यांना नोकऱ्या देऊ हे आश्वासन कागदावरच राहिले. त्यांच्या न्यायासाठी कारखानदाराशी जो संघर्ष झाला त्यात लेखक अभावितपणे ओढला जातो. बेरडांचे गुण, अवगुण, मर्यादा, स्वभाव यांचे खरे दर्शन या कार्यातून घडते. शिकलेला असून फुकटच्या भाकरी भाजतो म्हणून घरचे लोक नाराज. कौटुंबिक व सामाजिक दोन्हीकडे कोंडी.

बेरड जमातीत पंचांचे निकाल हे सरकारी निकालापेक्षा अधिक बंधनकारक असतात. मग हे पंच स्वार्थी, खावू असले तरी चालतात. वैयक्तिक स्वार्थासाठी संघटनेत फूट पाडण्याचा प्रयत्न सर्वत्रच दिसतो.

कानडी शब्द व कानडी रचना हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य आहे. 'एकटा पुजारीला घेऊन आला.', 'आणीबाणीचा फायदा उठवून माझे विरोधक मला दलित पँथरशी संबंध जोडून पोलिस खात्याला कळवले.' या वाक्यरचनेतील कानडी प्रभाव जाणवतो. अनेक कानडी शब्दही सहजतेने आले आहेत. बेळगावच्या (कानडीमिश्रित) मराठीचे रूप प्रभावी दिसते. बोली भाषा आहे तशी आलेली आहे. मुद्दाम शुद्ध करण्याचा अट्टाहास केलेला नाही.

पूर्ण आत्मकथन किंवा जमातीच्या पूर्ण समस्या यात आलेल्या नाहीत. दोन्हींचे मिश्रण केले नसते तर हे लेखन आटोपशीर वाटले असते. समाजशास्त्रदृष्टचाही या पुस्तकास महत्त्व आहे. एकाच पुस्तकात संपून न जाता अनेक नवीन वाटांनी लेखन व्हावे ही लेखकाकडून अपेक्षा.

(बेरड. लेखक— भीमराव गस्ती, पारख प्रकाशन, बेळगाव. किंमत ८५ रु.)

* * *

अनुक्रमणिका

# वाचकांची पत्रे

---

प्रिय संपादक,

जी. एं. संबंधी त्यांच्या मृत्यूनंतर आणि मृत्यूपूर्वी बरेच लिहिले गेले. मृत्यू-नंतरच्या बहुतेक लेखनात एक प्रकारचा औपचारिक, आलंकारिक आणि अ-वाङ्-मयीन सूर अधिक होता. पुष्कळसा शाळकरी. पु. ल. देशपांडे, विजया राजाध्यक्ष ही या लेखनाची काही उदाहरणे. काव्यरूप श्रद्धांजली वगैरे तर भंकसच.

लक्षणीय असे मरणोत्तर लेख दोन : ग. वा. बेहरे यांचा 'सोबत' मधील 'जी. ए. : एक दुर्मिळ वनस्पती' आणि जयवंत दळवी यांचा 'ललित'च्या जी. ए. कुलकर्णी विशेषांकामधील 'जी. ए.–एक विलक्षण माणूस!' हे ते लेख. या लेखांत जी. एं.कडे झापडरहित स्वच्छ दृष्टीतून पाहण्याचा निर्भीड प्रयत्न आहे. बेहेरे यांच्याप्रमाणे मीही जी. एं.चा 'आश्रित' होण्याचे तीस-बत्तीस वर्षे नाकारले. आणि दळवी यांच्याआधी जी. एं.च्या 'वलयनिर्मित-तंत्रा'बद्दल वेळोवेळी भाष्य केले. 'एका बाजूला प्रसिद्धीबद्दल तुच्छता दाखवायची आणि दुसऱ्या बाजूला प्रसिद्धीचे आकर्षण ठेवायचे,' असे या तंत्राचे नेमके वर्णन दळवींनी केलेले आहे. 'काही वेळा खोटेपणा करणारा असा दुसरा कोणी माणूस माझ्या ओळखीचा नाही. फक्त एकमेव जी. ए.!' असे प्रशस्तीपत्रही त्यांनी जी. एं.ना दिले आहे!

प्रश्न खोटेपणाचा नाही. 'दिसणे' आणि 'असणे' यांतील आहे. जी. ए. ही व्यक्ती आणि त्यांचे साहित्य यांबाबत 'दिसते तसे नसते, म्हणूनच जग फसते' हा धोक्याचा कंदील हातात बाळगूनच शोधाशोध करावयास हवी. त्यांच्या वागण्या-लिहिण्यात 'चकवा' आहे. चकव्याच्या जागा बऱ्याच आहेत. अतिभावडेपणा आणि अतिसंशयीपणा या दोन 'ध्रुवां'वरून या चकव्याचे आकलन होणार नाही.

जी. एं.च्या मृत्यूपूर्वी त्यांच्या कथांविषयी लक्षात घेण्यासारखी समीक्षा एकट्यानेच लिहिली– गंगाधर गाडगीळ यांनी. त्याखालोखाल माधव आचवल, धों. वि. देशपांडे यांची 'आख्याने' ह. भ. प. पांगारकरांनासुद्धा मागे टाकणारी. स्वतःला

जी. एं.चे मित्र म्हणवून घेणाऱ्या तथाकथित समीक्षकांनी समीक्षकाहून 'जनतासंपर्क अधिकारी' ही भूमिका अधिक इमानाने वठवली, असे नमूद करावे लागेल. अशा लेखनात भगताचा भावडेपणा आणि उत्साहाचा उतावळेपणा आढळल्यास त्याचे नवल वाटू नये.

जी. ए. आणि त्यांचे साहित्य हे चांगल्या अर्थाने 'फसवे' आहे हे गृहीत धरून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे, त्यांच्या साहित्याच्या आकलनात साहाय्य होऊ शकेल एवढ्याच मर्यादेपर्यंत, अत्यंत जबाबदारीने मिळणाऱ्या माहितीची विश्वसनीयता तपासून एक साधन म्हणून महत्त्व मानावे. आज– गेली काही वर्षे– दिसत आहे ते चित्र असे : जी. ए. वाचणे, जी. एं.बद्दल बोलणे-लिहिणे ही हास्यास्पद 'फॅशन' झाली आहे. जी. एं. ना न भेटताही त्यांच्याशी जवळीक (?) असलेले 'ग्रेस' नुकतेच धारवाडमध्ये मला भेटले. त्यांची-जी. एं.ची भेट झाली नव्हती हे मला त्यांच्याकडून कळले. याउलट पु. ल. देशपांडे आणि जी. ए. यांच्या धारवाडमधील भेटीचा मी साक्षीदार असूनही त्यांची भेट झाली नव्हती असे वेहेरे यांच्या जी. एं. वरील मृत्युलेखात मी वाचले. याही चकव्याच्याच जागा आहेत.

जी. एं.ची 'पत्रे' हा सर्वांत मोठा 'चकवा' आहे. या पत्रांचा संग्रह व्हावयास हवा : त्यांचा सखोल अभ्यासही व्हावयास हवा. विशेषतः त्यातून व्यक्त होणारी जी. ए. ची वाङ्मयीन मते, त्यांतील सुसंगती-विसंगतींसह, त्यांच्या स्वतःच्याच लेखनाशी कोणते नाते सांगतात हा शोध महत्त्वाचा ठरेल. जी. ए. या माणसाबद्दलचा वावदुक कुतुहलखोरपणा आणि लेखनाबद्दलचा पोरकट भक्तिभाव बाजूला ठेवून 'मित्र' आणि 'शत्रू' या दोन्ही भूमिका त्याज्य मानून जी. एं.चे लेखन गंभीर अभ्यासाचा विषय बनवण्याची आवश्यकता आहे. 'माणूस नावाचा बेटा'मधील दत्तूने विश्वमानवाच्या संकल्पनेची थट्टा केलेली आहे. या कथेचा लेखन-प्रकाशनकाल आणि त्याच सुमारास बेल्लारी येथे झालेल्या कन्नड साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून विनायक कृष्ण गोकाक यांनी 'विश्वमानवनागवेकू' ('विश्वमानव झाले पाहिजे') या विचाराचा केलेला उच्चार यांचा संभाव्य अन्योन्यसंबंध तपासणे हा वावदूकपणा ठरणार नाही. हा संबंध तपासताना जी. एं.चा दत्तू गोकाकांचा उपहास करीत आहे असे स्पष्ट झाल्यास 'अश्रूंची झाली फुले' मध्ये प्रारंभीच्या विद्यानंदात वसंत कानेटकर गोकाकांच्या काही हृद्य छटा का मिसळतात आणि 'बखर एका राजाची' मधील फर्ग्युसनच्या आठवणीत गोकाकांच्या सुंदर व्याख्यानांचा संदर्भ त्र्यं. वि. सरदेशमुख का देतात याचाही उलगडा व्हावासा वाटेल आणि कदाचित जी. एं.च्या व्यक्तिमत्त्वातील / लेखनातील चकव्याची आणखी काही उदाहरणे डोळ्यांपुढे येऊ लागतील.

डॉ. पंडित आवळीकर, धारवाड

अनुक्रमणिका

सप्रेम नमस्कार वि.

मराठीतील एक थोर साहित्यिक श्री. जी. ए. कुलकर्णी यांच्या साहित्यावर असंख्य वाचकांनी नितान्त प्रेम केले. त्यांच्या साहित्याचा अभ्यास करणाऱ्या आणि करू इच्छिणाऱ्या अनेकांना जी. एं.चा स्वभाव, त्यांचा व्यासंग आणि त्यांची साहित्य व मानवी जीवन याबद्दलची मते समजल्यास त्यांच्या साहित्याचे आकलन अधिक चांगले होऊ शकेल, असे वाटते. यासाठी जी. एं.नी आपल्या मित्रांना लिहिलेली पत्रे उपलब्ध झाली पाहिजेत, अशी इच्छा या अनेक अभ्यासकांनी जाहीररीत्या व खासगी रीत्याही व्यक्त केली. त्यांच्या साहित्याच्या अभ्यासासाठी त्यांची पत्रे उपलब्ध होणे आवश्यक आहे.

आपणाकडील जी. ए. कुलकर्णी यांच्या पत्राच्या झेरॉक्स प्रती आम्हाला १५ सप्टेंबर १९८८ पर्यंत पाठवाव्यात अशी विनंती आहे.

पत्रे पाठवण्याचा पत्ता : पु. ल. देशपांडे, रुपाली, ७७७ शिवाजीनगर, पुणे–४११००४.

कळावे,

आपले

**पु ल. देशपांडे**

म. द. हातकणंगलेकर, ग. प्र. प्रधान, रामदास भटकळ, श्री. पु. भागवत.

श्री. संपादक,

एप्रिल-जून १९८८ अंकातील डॉ. पठाण यांचा 'नाथांचे भाषाप्रभुत्व' हा लेख महाराष्ट्राचे लोकनाथ– संत एकनाथ या ग्रंथात 'नाथांची भाषा सृष्टी' नावाने ६।२।८८ रोजी प्रसिद्ध झालेला आहे. (प्रकाशक– शिवपार्वती प्रतिष्ठान, पैठण).

**डॉ. चंद्रकांत धांडे, पैठण**

(लेख आधीच मिळालेला होता. 'आगामी ग्रंथातून' असा उल्लेख करावयाचे राहून गेले. याबद्दल दिलगिरी वाटते. –**संपादक**)

डॉ. यू. म. पठाण यांच्या लेखात 'कुत्ना थमाल ले थमाल आपुल्या गायी' या पदाचे कवी म्हणून संत एकनाथांचे नाव टाकले आहे. हे पद नामदेवांचे आहे.

**डॉ. बापूजी संकपाळ**, कोल्हापूर

(हे पद नामदेवांचेच आहे. एकनाथांचे नाही. –डॉ. पठाण)

* * *

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद
## वार्षिक साधारण सभा

**सूचना**

टिळक रस्ता, पुणे ३०.
दि. १ सप्टेंबर १९८८

स. न. वि. वि.

म. सा. परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार दि. २५ सप्टेंबर १९८८ रोजी पुणे येथे माधवराव पटवर्धन सभागृहात सायंकाळी ४–३० वाजता भरणार आहे. या सभेला सर्वांनी उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे. या सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल–

**सभेत करावयाची कामे**

श्रद्धांजली
मागील सभेचे कार्यवृत्त वाचून संमत करणे.
१९८७–८८ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.
१९८७–८८ चे उत्पन्न-खर्च-पत्रक आणि ताळेबंद पत्रक संमत करणे.
१९८८–८९ चा अर्थसंकल्प संमत करणे.
१९८८–८९ करिता हिशोब तपासनीसांची नेमणूक करणे.
म. अध्यक्षांच्या संमतीने आयत्या वेळी येणारी कामे.

आपले,

| | | |
|---|---|---|
| **म. श्री. दीक्षित** | **राजेंद्र बनहट्टी** | **ग. प्र. प्रधान** |
| कोषाध्यक्ष | कार्याध्यक्ष | अध्यक्ष |
| **गं. ना. जोगळेकर** | **ज्योत्स्ना देवधर** | **चिं. श्रं. जोशी** |
| कार्यवाह | कार्यवाह | कार्यवाह |

**विशेष सूचना**

पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. अशा वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.

वरील कामकाजासंबंधी मतदार-सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील, अगर ठराव मांडावयाचा असेल तर लेखी स्वरूपात तसे १७ सप्टेंबर ८८ पर्यंत कळवावे.

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ३०

**वर्ष ८२ वे, नोंदणी क्र. ४०९**

## वार्षिक कार्यवृत्त १९८७–८८

**(१ जुलै १९८७ ते ३० जून १९८८ अखेर)**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या १ जुलै ८७ ते ३० जून १९८७ या वर्षातील कार्याचे वृत्त सभासदांना सादर करण्यास आम्हांस आनंद होत आहे.

**सभासद संख्या :**

व रिंभी वार्षिक साधारण ४१३२ आणि आजीव २२६७ अशी एकूण सभासद संख्या ६३९९ होती. वर्षभरात १६० साधारण झाले. आणि २०३ आजीव सभासदांची भर पडल्यामुळे जून ८८ अखेर साधारण ४२९२ आणि आजीव २४७० अशी एकूण संख्या ६७६२ झाली. एकूण सुमारे २५०० वार्षिक साधारण सभासदांकडून ८७–८८ सालची वर्गणी येणे बाकी आहे.

**कार्यालयीन सभा :**

वर्षभरात कार्यकारी मंडळाच्या एकूण तीन सभा झाल्या. दि. २७.९.८७ रोजी वार्षिक साधारण सभा अशा एकूण चार सभा झाल्या.

या वर्षात कार्यकारी मंडळाने पुढील महत्त्वाचे निर्णय घेतले.

१) कै. भीमराव कुलकर्णी यांच्या स्मृत्यर्थ जमविलेला सुमारे अकरा हजारांचा निधी विश्वस्तांकडे सुपूर्त करण्यात आला. या निधीच्या व्याजातून साहित्य संस्थेत निरलसपणे कार्य करणाऱ्या एका कार्यकर्त्यास कै. डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या नावे दरवर्षी रु. १००१/– चा पुरस्कार देण्यात यावा.

२) साहित्यिक साहाय्य निधीच्या जमलेल्या रकमेतून एक लक्ष रुपयांचा निधी विश्वस्तांकडे सुपूर्त करण्यात आला.

३) भाषा व साहित्य : संशोधन खंड ३, संपादक डॉ. व. स. जोशी व प्रा. म. ना. अदवंत यांनी संपादित केला असून हा ग्रंथ व कै. वा. म. जोशी यांच्या अप्रकाशित लेखांचे संकलन संपादक प्रा. गो. म. कुलकर्णी व डॉ. द. दि. पुंडे यांनी

अनुक्रमणिका







तयार केले असून या दोन्ही ग्रंथांस साहित्य संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळताच परिषदेतर्फे प्रकाशित करण्यात यावेत असा निर्णय घेण्यात आला.

४) नगरचे एक लेखक श्री. अशोक थोरे यांना तातडीची आर्थिक मदत वैद्यकीय साहाय्यासाठी म्हणून रु. १०००/– साहित्यिक साहाय्य निधीच्या व्याजातून देण्याचा निर्णय झाला.

५) साधारण सभासदांनी आपली वार्षिक वर्गणी रु. २०, दि. ३० सप्टेंबरच्या आत भरली पाहिजे, तशी ती न भरली गेल्यास त्या व्यक्तीचे सदस्यत्व त्या वर्षासाठी आपोआप रद्द समजण्यात यावे.

**वार्षिक साधारण सभा–**

दि. २७ सप्टेंबर १९८७ रोजी परिषदेची वार्षिक साधारण सभा श्री. शंकर पाटील यांच्या अध्यक्षतेखाली झाली. १९८६–८७ चे कार्यवृत्त, उत्पन्न खर्चपत्रक, ताळेबंद आणि ८७–८८ चा अर्थसंकल्प संमत करण्यात आला. सर्वश्री वि. त्र्यं. शेटे, अरविंद पाटोळे, म. श्री. दीक्षित, क. नी. किंकर, विश्वनाथ खैरे, वसंत गाडगीळ, पु. ए. कडूरकर इ. सदस्यांनी चर्चेत भाग घेतला व विधायक सूचना केल्या. कार्यकारी मंडळाने केलेल्या कामाबद्दल समाधान व्यक्त केले. सभेचे इतिवृत्त तावडतोब तयार करून सर्व उपस्थित सदस्यांना पाठविण्यात आले.

## साहित्यिक व सांस्कृतिक कार्य :

गेल्या वर्षभरात पुणे येथे पुढीलप्रमाणे कार्यक्रम झाले :

**जुलै ८७** : दि. ६ जुलै रोजी कै. र. वा. दिघे स्मृत्यर्थ डॉ. सुधाकर भोसले यांचे 'ग्रामीण साहित्याकडून अपेक्षा' या विषयावर व्याख्यान. दि. २०–कै. वा. म. जोशी स्मृत्यर्थ प्राचार्य कमलाकर श्रीखंडे यांचे 'एकोणिसाव्या शतकातील स्त्री-जीवन' या विषयावर व्याख्यान झाले. दि. २२– कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मृत्यर्थ श्री. शंकर पाटील यांचे 'ललित साहित्य : काही समज आणि गैरसमज' या विषयावर व्याख्यान झाले. दि. ३० व ३१ रोजी डॉ. दि. ब. केरूर यांचे संतश्रेष्ठ सावता महाराज यांच्या स्मरणार्थ 'महाराष्ट्रातील अवधूत गंगा दोन अमृतधारा' या विषयावर दोन व्याख्याने झाली.

**ऑगस्ट ८७** : दि. ९– श्री. शंकर पाटील सत्कार समितीने जमविलेल्या व परिषदकडे सुपूर्त केलेल्या निधीतून या वर्षी प्रथमच श्री. गौरी देशपांडे यांच्या 'आहे हे असं आहे' या कथासंग्रहाला पारितोषिक व मानचिन्ह देण्याचा समारंभ झाला. श्री. अरविंद गोखले या प्रसंगी अध्यक्ष होते. त्यांच्या हस्ते पारितोषिक देण्यात आले.

सौ. गौरी देशपांडे परदेशी गेल्या असल्यामुळे त्यांच्यातर्फे प्रकाशक श्री. श्री. पु. भागवत यांनी पारितोषिकाचा स्वीकार केला. परीक्षकांतर्फे डॉ. विलास खोले यांचे भाषण झाले.

दि. १७– कै. पु. भा. भावे स्मृतिदिनानिमित्त डॉ. शशिकांत लोखंडे यांचे 'कथाकार भावे' या विषयावर व्याख्यान झाले. पुणे विद्यापीठ व महिला विद्यापीठात एम्. ए. मराठी मध्ये सर्वप्रथम आलेल्यांना पु. भा. भावे पारितोषिक प्रदान करण्यात आले. या वेळी सौ. इला भाटे व श्री. मिलिंद बेडेकर यांनी भावे यांच्या नाटकातील काही प्रवेश सादर केले. राज्य शिक्षणशास्त्र संस्थेच्या सभागृहात हा कार्यक्रम झाला.

**सप्टेंबर** : दि. १४– बालकवी स्मृतिदिनानिमित्त श्री. नारायण सुर्वे यांचे 'साठोत्तरी मराठी कविता' या विषयावर भाषण झाले. दि. २५– परिषद व महाराष्ट्र राष्ट्रभाषा प्रचार समिती यांच्यातर्फे स्व. महादेवी वर्मा यांच्या निधनाबद्दल दुखवटा सभा घेण्यात आली. या वेळी श्रीमती ज्योत्स्ना देवधर अध्यक्षस्थानी होत्या. डॉ. गं. ना. जोगळेकर, डॉ. सिंधू भिंगारकर, डॉ. ह. श्री. साने, डॉ. चंद्रशेखर वर्वे यांची या वेळी भाषणे झाली. शेवटी दुखवट्याचा ठराव संमत करण्यात आला. दि. २९– कै. सावित्रीबाई बार्लिंगे यांच्या स्मृत्यर्थ श्री. यदुनाथ थत्ते यांचे 'नवी संस्कृती' या विषयावर व्याख्यान झाले.

**ऑक्टोबर** : दि. ६– म. म. द. वा. पोतदार यांच्या स्मृतिदिनी प्रा. राजा दीक्षित यांचे 'इतिहासाचे मारेकरी' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. अ. रा. कुलकर्णी समारंभाचे अध्यक्ष होते. या प्रसंगी पहिलेच 'पोतदार स्मृतिपारितोषिक' (रु. २५१/–) डॉ. जयसिंगराव पवार यांच्या 'सेनापती संताजी घोरपडे' या ग्रंथास अध्यक्षांच्या हस्ते देण्यात आले. दि. १५– एकसष्टाव्या ठाणे साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर यांचा प्रकट सत्कार करण्यात आला. अध्यक्षस्थानी श्री. शंकर पाटील होते. प्रा. द. मा. मिरासदार, श्री. चित्तरंजन कोल्हटकर, प्रा. वीणा देव, डॉ. वि. भा. देशपांडे यांची या प्रसंगी भाषणे झाली. प्रा. कानेटकर यांना परिषद प्रकाशने व पुष्पगुच्छ देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. अ. भा. मराठी नाट्यसंमेलनाचे नियोजित अध्यक्ष श्री. चित्तरंजन कोल्हटकर यांचाही या प्रसंगी सत्कार करण्यात आला. दि. ९– परिषदेचे निष्ठावंत कार्यकर्ते डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या दुःखद निधनाबद्दल दुखवटा सभा घेण्यात आली. अध्यक्षस्थानी श्री. शंकर पाटील होते. या प्रसंगी श्री. राजेंद्र बनहट्टी, डॉ. द. दि. पुंडे, प्रा. शं. ना. नवलगुंदकर, डॉ. ललिता कुंभोजकर यांची भाषणे झाली. शेवटी दुखवटा ठराव संमत करण्यात आला. दि. ३– परिषदेच्या ठाणे शाखेचे प्रथमपासूनचे कार्यकर्ते व परिषदेशी विविध नात्यांनी संबंधित असलेले प्रा. म. वि. फाटक यांच्या दुःखद

अनुक्रमणिका

निधनाबद्दल शोकसभा घेण्यात आली. डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रा. म. ना. अदवंत, प्रा. हृ. श्री. शेणोलीकर, श्री. म. श्री. दीक्षित यांची या वेळी भाषणे झाली. शेवटी दुखवटा ठराव संमत करण्यात आला.

दि. २९, ३०– कै. व. हृ. गोळे यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. पुष्पा भावे यांची दोन व्याख्याने, 'नाट्यप्रयोग : आता आणि इथे' व 'नाट्यानुभव : अमूर्त आणि दूरवरचा' या विषयावर झाली.

**नोव्हेंबर** : दि. २९– कै. माधव जूलियन स्मृतिदिनानिमित्त श्री. गोपीनाथ तळवलकर यांच्या अध्यक्षतेखाली कविसंमेलन झाले. यात सर्वश्री राजा दीक्षित, रमण रणदिवे, दीपक करंदीकर, राजेन्द्र शहा, प्रदीप निफाडकर, म. भा. चव्हाण, इलाही जमादार, व अरुणा ढेरे या कवि-कवयित्रींनी भाग घेतला. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन प्रा. राजा दीक्षित यांनी केले.

**डिसेंबर** : दि. २५– २६ कै. श्री. म. माटे स्मृतिदिनानिमित्त 'आदिवासींचे जिणे' या विषयावर डॉ. गोविंद गारे यांची दोन भाषणे झाली. दि. २१–कै.जी.ए. कुलकर्णी, यांच्या निधनाबद्दल शोकसभा घेण्यात आली. अध्यक्षस्थानी श्री. शंकर पाटील होते. श्रीमती शांता शेळके, चंद्रशेखर बर्वे, अरुणा ढेरे, चंद्रकांत परचुरे यांची या वेळी भाषणे झाली. शेवटी दुखवट्याचा ठराव संमत करण्यात आला.

**जानेवारी** : दि. १८– कै. वि. द. घाटे स्मृत्यर्थ डॉ. भालचंद्र फडके यांचे 'लेखकाचे स्वातंत्र्य' या विषयावर भाषण झाले.

**फेब्रुवारी** : दि. १५– कै. नरहर कुरुंदकर स्मृत्यर्थ डॉ. प्र. ल. गावडे यांचे 'शिक्षकांची आत्मचरित्रे : एक समीक्षा' या विषयावर व्याख्यान झाले.

**मार्च** : दि. ५– कै. ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ डॉ. चंद्रशेखर बर्वे यांचे 'आपापले गाव-मराठी साहित्यिकांनी रंगविलेले' या विषयावर भाषण झाले. दि.२१ कै. बा. सी. मर्ढेकर स्मृत्यर्थ डॉ. अरुणा ढेरे यांचे 'काही आदिबंध: काही कविता' या विषयावर व्याख्यान झाले.

**एप्रिल** : दि. १०– कै. श्रीधर व्यंकटेश केतकर स्मृतिदिन–डॉ.मेधा कुमठेकर यांचे 'दुभंगलेली घरे' या विषयावर व्याख्यान झाले. सकाळी कमला नेहरू उद्यानातील डॉ. केतकरांच्या समाधीस पुष्पांजली अर्पण करण्यात आली.

**जून** : दि. २२– कै. नाथ माधव स्मृतिदिनानिमित्त डॉ. शंकर अभ्यंकर यांचे 'इतिहासाची प्रेरणा' या विषयावर व्याख्यान झाले.

## का. र. मित्र शारदीय व्याख्यानमाला :

लेली कथा ' हा व्याख्यानमालेचा विषय होता. मराठीतील दहा प्रमुख कथाकारांच्या एका आवडलेल्या कथेचे रसग्रहण या वेळी वक्त्यांनी केले.

डॉ. हेमंत इनामदार– 'संकष्ट चतुर्थी' (दिवाकर कृष्ण), डॉ. गं. ना. जोगळेकर– 'सुपारी' (य. गो. जोशी), डॉ. अरविंद वामन कुलकर्णी– 'किडलेली माणसे' (गंगाधर गाडगीळ), सौ. शशिकला उपाध्ये– 'कुमार संभव' (अरविंद गोखले), श्रीमती शांता शेळके– 'जप्ती' (वसुंधरा पटवर्धन), डॉ. सुधाकर भोसले– 'वाई' (व्यंकटेश माडगूळकर), डॉ. लीला दीक्षित– 'भावबळ' (महादेव-शास्त्री जोशी), डॉ. चंद्रशेखर बर्वे– 'बुट्टी' (दि. बा. मोकाशी), प्रा. वीणा देव– 'सतरावे वर्ष' (पु. भा. भावे), प्रा. गो. म. कुलकर्णी– 'कैरी' (जी. ए. कुलकर्णी)

## अभिनंदन-सत्कार-अभीष्टचिंतन

**डॉ. भैरप्पा यांचा सत्कार–** दि. ९ डिसेंबर ८७ रोजी कन्नड कादंबरीकार डॉ. एस. एल. भैरप्पा यांचा सत्कार परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते करण्यात आला. या प्रसंगी डॉ. अ. रा. तोरो आणि श्रीमती शांता शेळके यांची भाषणे झाली.

**डॉ. रा. चिं. ढेरे यांचा सत्कार–** 'श्रीविठ्ठल : एक महासमन्वय' या ग्रंथास साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाल्याबद्दल डॉ. रा. चिं. ढेरे यांचा परिषदेतर्फे दि. ४ फेब्रुवारी 'रोजी श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते शाल, श्रीफल देऊन सत्कार करण्यात आला. याप्रसंगी श्री. ढेरे यांच्या गौरवार्थ प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. प्र. न. जोशी, डॉ. ॲन फेल्डहाऊस व डॉ. गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली.

'समाज शिक्षण माले'च्या ४५० व्या– स्वाध्याय– अंकाचा प्रकाशन-समारंभ यावर्षी पार पडला. मालेच्या संपादिका डॉ. सरोजिनी वावर यांचा या निमित्ताने परिषदेतर्फे सत्कार करण्यात आला.

श्री. ह. ना. जोशी (कवी सुधांशु) औदुंबर यांनी स्थापन केलेल्या सदानंद साहित्य मंडळाचे ४५ वे साहित्य संमेलन १४ जानेवारी ८८ रोजी औदुंबर येथे साजरे झाले. संमेलनास परिषदेतर्फे शुभेच्छा व्यक्त करण्यात आल्या.

श्री. शं. ना. नवरे यांना यंदाचा 'पु. भा. भावे साहित्य पुरस्कार' मिळाला. त्याबद्दल त्यांचे अभिनंदन परिषदेतर्फे करण्यात आले.

साहित्य अकादमीच्या जनरल कौन्सिलवर डॉ. गो. मा. पवार यांची 'मराठी' साठी निवड झाली. परिषदेतर्फे त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

श्री. किशोर पाठक, (नाशिक परिषदेच्या शाखेचे कार्याध्यक्ष.) यांना कवी मिळाल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

अनुक्रमणिका

प्राचार्य श्री. शिवाजीराव भोसले यांनी एकसष्टाव्या वर्षात पदार्पण केले. परिषदेतर्फे त्यांना शुभेच्छा देण्यात आल्या.

श्री. श्री. ना. पेंडसे यांना साहित्य, कला, वाङमय या क्षेत्रांतील श्रेष्ठ व्यक्तीस दिला जाणारा 'गदिमा' पुरस्कार प्राप्त झाल्याबद्दल परिषदेतर्फे त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

श्री. गोपीनाथ तळवलकर यांनी नुकतेच ८१ व्या वर्षात पदार्पण केले. कै. माधव जूलियन स्मृतिदिनी दि. २९ नोव्हेंबर ८७ रोजी त्यांचा हार्दिक सत्कार करण्यात आला.

प्रा. ग. प्र. प्रधान यांना 'साता उत्तराची कहाणी' या पुस्तकाबद्दल भारतीय भाषा परिषद, कलकत्ता यांच्यातर्फे १९८६ चे, मराठीतील सर्वोत्कृष्ट ग्रंथाचे पारितोषिक मिळाल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) यांना संगीत नाटक अकादमीचा यंदाचा नाट्यलेखन पुरस्कार प्राप्त झाला, याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

बालकुमार साहित्य संमेलन कराडच्या अध्यक्षा श्रीमती लीलावती भागवत यांच्या सत्काराचा व त्याप्रीत्यर्थ चहापानाचा अनौपचारिक कार्यक्रम दि. ६-११-८७ रोजी करण्यात आला.

स्वामी स्वरूपानंद स्मृत्यर्थ भारतीय संस्कृती, संतवाङमय व तत्त्वज्ञान या विषयांतील प्रथम पारितोषिक डॉ. वि. रा. करंदीकर यांना मिळाले. परिषदेतर्फे त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

मध्यप्रदेश शासनातर्फे या वर्षीचा 'राष्ट्रीय कालिदास' पुरस्कार मराठीतील श्रेष्ठ लेखक श्री. पु. ल. देशपांडे यांना देण्यात आला. याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

## परिषदेचा ८२ वा वर्धापनदिन

दि. २७ मे हा परिषदेचा वर्धापन दिन. ८२ वा वर्धापन दिन या वर्षी विविध भरगच्च कार्यक्रम आखून साजरा करण्यात आला. महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक प्रदान करणे, साहित्यिक साहाय्य निधीच्या व्याजातून प्रथमच ज्येष्ठ लेखकास मानधन देणे, मराठी वाङ्मयेतिहासाच्या खंड ६ भाग १ चे प्रकाशन, विविध वाङ्मय प्रकारातील ग्रंथलेखकांना पारितोषिके व प्रमाणपत्रे देण्याचा कार्यक्रम यांच्या यामध्ये समावेश होता.

प्रदीर्घ वाङमयसेवेबद्दल परिषदेतर्फे दिले जाणारे रु. ३०००।– चे महाराष्ट्र साहित्य परिषद पारितोषिक श्री. नानासाहेब गोरे यांच्या हस्ते श्री. गं. बे. खानोलकर यांना या वेळी मानचिन्हासह अर्पण करण्यात आले. कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी

यांनी सांप्रतच्या कार्यकारिणीने केलेल्या विविध कार्यांचा आढावा घेणारे प्रस्ताविक केले. प्रा. गो. म कुलकर्णी यांनी श्री. खानोलकरांचा परिचय करून दिला. परिषदेचे अध्यक्ष श्री.शंकर पाटील यांनी साहित्यिक साहाय्य निधीबद्दल माहिती दिल्यानंतर या निधीच्या व्याजातून प्रथमच ज्येष्ठ कवी आणि समीक्षक डॉ. वा. भा. पाठक यांना पाच हजार रुपयांचे मानधन अर्पण करण्यात आले. डॉ. वा. भा. पाठक यांच्या वाङमयीन कार्याचा परिचय डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी करून दिला. डॉ. वा. भा. पाठक यांनी आपल्या भाषणात परिषदेने मानधन दिल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केली.

अहमदनगरचे तरुण कथालेखक श्री. अशोक थोरे यांना वैद्यकीय उपचारासाठी या निधीतून रु. १००० चे अर्थसाहाय्य देण्यात आल्याचे कार्याध्यक्ष श्री. बनहट्टी यांनी जाहीर केले. मराठी वाङमयेतिहास योजनेतील खंड ६, भाग १, (संपादक प्रा. गो. म. कुलकर्णी व डॉ. व. दि. कुलकर्णी) या ग्रंथाचे प्रकाशन याप्रसंगी करण्यात आले. प्रस्तुत खंडाबद्दलचे निवेदन प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी केले. विविध वाङमय– प्रकारांतील उत्कृष्ट ग्रंथाच्या लेखकांना परिषदेतर्फे दरवर्षी दिली जाणारी पारितोषिके, या वर्षीपासून समक्ष देण्याचा व त्याबरोबर प्रमाणपत्रे देण्याचा कार्यक्रम यानंतर करण्यात आला. पारितोषिकासंबंधी निवेदन प्रा. म. ना. अदवंत यांनी केले. अध्यक्षांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली.

याच समारंभात रु. ६०,०००।– चा प्रा. रा. श्री. जोग स्मारकनिधी परिषदेच्या स्वाधीन करण्याची घोषणा या समितीचे अध्यक्ष डॉ. वि. रा. करंदीकर यांनी केली. कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री. नानासाहेब गोरे यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात परिषदेने हाती घेतलेल्या विविध उपक्रमांबद्दल समाधान व्यक्त केले.

या सर्व कार्यक्रमाचे संचालन कार्यवाह श्रीमती ज्योत्स्ना देवधर व व्यवस्थापन कार्यवाह श्री. राजा फडणीस यांनी केले.

**स्वागत आणि भेटीगाठी :**

ठाणे येथील अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष व ठाण्याचे महापौर श्री. वसंत डावखरे यांनी दि. ६।११।८८ रोजी परिषदेस भेट देऊन परिषदेच्या कार्याची माहिती घेतली. परिषदेने सुरू केलेल्या साहित्यिक साहाय्य निधीस ठाणे महानगरपालिकेतर्फे रु. ११०००।– व व्यक्तिशः सौ. शकुंतला डावखरे यांच्या नावे रु. १००००।– ची देणगी श्री. डावखरे यांनी ठाणे संमेलनप्रसंगी परिषदेच्या स्वाधीन केली आहे. श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते याप्रसंगी श्री. डावखरे यांचा सत्कार करण्यात आला.

सावंतवाडी येथे ६ व ७ फेब्रुवारी ८८ रोजी, दक्षिण रत्नागिरी साहित्य

संघ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्यातर्फे लेखकमेळावा आयोजित केला होता. यात परिसंवाद, कविसंमेलन, मुलाखत इ. कार्यक्रम झाले. या प्रसंगी परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा आयोजित करण्यात आली होती. कार्यक्रमासाठी परिषदेचे अध्यक्ष श्री. शंकर पाटील, तसेच कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी, कोषाध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर, कार्यवाह श्री. राजा फडणीस, डॉ. व. स. जोशी, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. लीला गोविलकर हे सर्वजण उपस्थित होते. श्री. शंकर पाटील यांच्या कथाकथन कार्यक्रमातून साहित्यिक साहाय्य निधीला तीन हजार तीनशे तीस रुपये देणगीदाखल मिळाले. कार्यकारिणी सदस्य डॉ. वसंत सावंत व श्री. हरिहर आठलेकर यांच्याकडे या मेळाव्याच्या यशाचे श्रेय जाते.

### दिवाळी अंक पारितोषिके

परिषदेतर्फे दरवर्षी दिवाळी अंक स्पर्धा घेण्यात येते, आणि तीन उत्कृष्ट अंकांना 'विविध ज्ञानविस्तार' कर्ते रावसाहेब मोरमकर, 'मासिक मनोरंजन' कर्ते का. र. मित्र आणि 'किर्लोस्कर' चे शं. वा. किर्लोस्कर या तीन संपादकांच्या स्मृत्यर्थ प्रत्येकी रु. १०१।– ची पारितोषिके दिली जातात. यंदा १९८७ च्या दिवाळी अंकातून निवडलेल्या पुढील तीन अंकांना पारितोषिके देण्यात आली.

१) 'माहेर' : संपादक– पु. वि. बेहेरे.
२) 'विशाखा' : संपादक– ह. ल. निपुणगे.
३) 'लोकमत' : संपादक– विजय दर्डा.

दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखास कै. अनंत काणेकर यांच्या स्मृत्यर्थ रु. २००।– चे पारितोषिक 'किस्त्रीम'च्या दिवाळी अंकातील श्री. सुभाष अवचट यांच्या 'आहे झाडच पुन्हा या गाण्यात' या लेखास देण्यात आले. स्पर्धेच्या निर्णयासाठी श्रीमती जोत्स्ना देवधर, श्री. राजा फडणीस, सौ. शशिकला उपाध्ये आणि प्रा. म. ना. अदवंत (निमंत्रक) यांची समिती नेमली होती.

### ग्रंथपारितोषिके :

परिषदेतर्फे १९८७ मध्ये प्रकाशित झालेल्या पुढील ग्रंथांना पारितोषिके देण्यात आली–

१) हरि नारायण आपटे पारितोषिक (कादंबरी) : 'अनावर्त'– कुंदा पारसनीस रु. १०१।–
२) वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) : 'तुंबाडचे खोत'– श्री. ना. पेंडसे रु. १०००।–
३) ह. स. गोखले पारितोषिक (कविता) : 'निरन्वय'– नीरजा, रु. ३००।–

४) नी. स. गोखले पारितोषिक (कथा) : '**ज्याचा त्याचा प्रश्न**'– प्रिया तेंडुलकर रु. ३००।--
५) अ. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) : प्रकाशक– चिरायू प्रकाशन, पुणे, '**विसाजीपंताची वीस कलमी बखर**' या पुस्तकासाठी रु. ३००।–
६) गिरिजा गंगाधर जांभेकर पारितोषिक (संपादित ग्रंथ) : '**साहित्य अध्यापन आणि प्रकार**' संपादक, श्री. पु. भागवत, रु. १००-००
७) ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा) : '**काळोखाचे कवडसे**'– अरुणा ढेरे, रु. ५००।–
८) तुळशीराम वाघ पारितोषिक (संतवाङ्मय) : '**शोध समर्थांचा**'– तु. द. जोशी, रु. २५०।–
९) सुशील प्रधान पारितोषिक (कुमार वाङ्मय) : '**बखर बिम्मची**'– जी. ए. कुलकर्णी रु. २००।–
१०) विनायक कोंडदेव ओक पारितोषिक (कुमार वाङ्मय) : '**हरवलेले शोध**'– पु. ग. वैद्य रु. १००।–

**११) ललितेतर वैचारिक ग्रंथ :**

अ) शि. म. परांजपे पारितोषिक : '**वारसा**' नरहर कुरुंदकर, रु. २५०।–
आ) ना. गो. चापेकर पारितोषिक : '**मराठी लोककथा – स्वरूप मीमांसा**'– सौ. वैदेही कोळेकर, रु. २५०।–
इ) विश्वनाथ पार्वती गोखले पारितोषिक : '**दलितांची नियतकालिके**' हरिश्चंद्र निर्मळे, रु. १५०।–
ई) श्री. शां. हणमंते पारितोषिक : '**मुक्तेश्वराची कविता : वाङ्मयीन अभ्यास**'– र. वा. मंचरकर रु. ३५०।–
उ) गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक : '**गांधी आणि आंबेडकर**' –गं. बा. सरदार, रु. ५५०।–
ऊ) गणेश सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक : '**सांस्कृतिक संचित**'– वि. रा. करंदीकर, रु. ४००।–

पारितोषिकांचा निर्णय करण्यासाठी परीक्षक म्हणून पुढील व्यक्तींनी काम केले : डॉ. हे. वि. इनामदार, श्री. राजा मंगळवेढेकर, श्री. दत्ता टोळ, श्री. ह. अ. भावे, श्री. अरुण खोरे, डॉ. चंद्रशेखर वर्वे, डॉ. वीणा देव, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. विलास खोले, डॉ. अंजली सोमण, प्रा. गो. म. कुलकर्णी डॉ. सु. रा. चुनेकर,

अनुक्रमणिका

डॉ. वि. म. कुलकर्णी, डॉ. अरविंद वामन कुलकर्णी, डॉ. ललिता कुंभोजकर आणि प्रा. म. ना. अदवंत (निमंत्रक).

**कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत पारितोषिके :**

(कै. चिं. वि. जोशी व कवी कुसुमाग्रज पारितोषिके)

दरवर्षी उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास व प्रकाशकास दिले जाणारे कॉंटिनेंटल प्रकाशन पुरस्कृत कै. चिं. वि. जोशी पारितोषिक १९८७ करिता श्री. वसंत बापट यांच्या 'बिसाजीपंताची वीस कलमी बखर' या पुस्तकाबद्दल रु. १२००।– व प्रकाशक श्री. वैभव भंडारी (चिरायू प्रकाशन, पुणे) यांना रु. ९००।– अशी पारितोषिके दि. १९ जानेवारी १९८८ या चिं. वि. जोशी यांच्या जन्मदिनी समारंभपूर्वक देण्यात आली. परिषदेच्या पटवर्धन सभागृहात हा कार्यक्रम आयोजित केला होता. प्रा. द. मा. मिरासदार हे समारंभाच्या अध्यक्षस्थानी होते. परीक्षकांच्या वतीने डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे याप्रसंगी भाषण झाले. उत्तरादाखल श्री. वसंत बापट यांनी भाषण केले. पारितोषिकाचा निर्णय डॉ. गं. ना. जोगळेकर, सौ. मंगला गोडबोले व श्री. पु. वि. बेहेरे या परीक्षकांच्या समितीने केला.

१९८७ चे कवी कुसुमाग्रज पारितोषिक : यावर्षी 'गोधडं' या कवितासंग्रहाबद्दल कवी श्री. वाहरू सोनावणे यांना रु. १२००।– व कवितासंग्रहाचे प्रकाशक श्री. रवी बेहेरे (रविराज प्रकाशन पुणे) यांना रु. ९००–०० ची पारितोषिके दि. २७ फेब्रुवारी ८८ या कवी कुसुमाग्रजांच्या जन्मदिनी समारंभपूर्वक देण्यात आली. पारितोषिक वितरण समारंभ परीषदेच्या सभागृहात डॉ. अनुराधा पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली साजरा झाला. परीक्षकांतर्फे डॉ. अरविंद वामन कुलकर्णी यांनी व पारितोषिकविजेते श्री. वाहरू सोनावणे यांनी उत्तरादाखल भाषण केले. पारितोषिकाचा निर्णय डॉ. अरविंद वा. कुलकर्णी, डॉ. वि. म. कुलकर्णी आणि डॉ. ललिता कुंभोजकर यांच्या समितीने केला.

**कविवर्य यशवंत पारितोषिक :** (कविता)

कविवर्य यशवंत यांच्या स्मरणार्थ त्यांच्या कुटुंबियांनी दिलेल्या देणगीच्या व्याजातून दरवर्षी उत्कृष्ट कवितासंग्रहास परिषदेतर्फे रु. ५०१।– चे पारितोषिक दिले जावयाचे आहे. १९८७ चे हे पहिले पारितोषिक डॉ. अरुणा ढेरे यांच्या 'यक्षरात्र' या कवितासंग्रहास दि. ९ मार्च ८८ रोजी श्री. शंकर पाटील यांच्या हस्ते समारंभपूर्वक देण्यात आले. डॉ. ललिता कुभोजकर यांचे काव्यसंग्रहाची ओळख करून देणारे भाषण झाले. डॉ. अरुणा ढेरे यांनी उत्तरादाखल भाषण केले व आपल्या काही कविता म्हणून दाखविल्या.

**दि. बा. मोकाशी पुरस्कार :**

कै. दि. बा. मोकाशी यांच्या स्मरणार्थ निधीच्या व्याजातून दरवर्षी दिले जाणारे पुरस्कार या वर्षी दि. २९ जून १९८८ रोजी १९८६-८७ मधील प्रथम प्रकाशित 'देशांतर्गत प्रवासवर्णन' या विभागात सर्वोत्कृष्ट पुस्तक म्हणून श्रीमती उषा देशपांडे यांच्या 'अंदमान' या पुस्तकाला रु. ५००-०० चा कै.दि. बा. मोकाशी स्मृतिपुरस्कार देण्यात आला. पुस्तकाची निवड करण्यासाठी साहित्य परिषदेने डॉ. गं. ना. जोगळेकर व प्रा. म. ना. अदवंत यांची परीक्षक समिती नियुक्त केली होती.

**देणगी :**

कै. आनंदीबाई शिर्के या मराठीतील जुन्या पिढीतील नामवंत लेखिका. त्यांच्या स्मृत्यर्थ श्रीमती सरला घाटे, ठाणे यांनी रु. १०,०००|– ची देणगी परिषदेकडे सुपूर्त केली आहे. या देणगीच्या व्याजातून दरवर्षी उत्कृष्ट कथासंग्रहास **'आनंदीबाई शिर्के कथा पारितोषिक'** देण्यात यावयाचे आहे. परिषद देणगीदारांची ऋणी आहे.

**संदर्भ ग्रंथालय :**

परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा लाभ सुमारे ६०० च्या वर सभासद वर्गणीदार घेत असतात. वर्षारंभी ग्रंथसंख्या २३९९७ होती. तीत खरेदी केलेले १०६, पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आलेले १२४, आणि देणगीदाखल आलेले २२२ अशा एकूण ४५२ ग्रंथांची भर पडून जून. ८८ अखेर ग्रंथसंख्या २४४४९ झालेली आहे.

श्री. रा. प्र. कानिटकर यांनी 'चित्रमयजगत'चे २३ वर्षांचे बांधीव व सुटे अंक; श्री. प्रमोद कापरे यांनी 'सोवत' साप्ताहिकाच्या ६ फायली, तसेच श्री. प्रमोद वसंत कामत यांनी मराठी शब्दकोश व मराठी ज्ञानकोश (डॉ. केतकर संपादित) यांचे संच याप्रमाणे परिषदेच्या ग्रंथालयास भेटीदाखल दिले. या सर्वांची परिषद ऋणी आहे.

**मराठी वाङ्मय कोश :**

डॉ. म. वि. गोखले (विभागीय संपादक) यांनी निरनिराळ्या लेखकांकडून वाङ्मयकोशासाठी नोंदी लिहून घेतल्या आहेत. नोंदींच्या टंकलेखनाचे काम चालू असून लवकरच हे काम पूर्ण होईल.

अनुक्रमणिका

**परीक्षाकार्य :**

जानेवारी १९८८ मध्ये झालेल्या मराठीच्या परीक्षांची एकूण २३ केन्द्रे होती. विशारद १४६, प्राज्ञ ६३, प्रवेश ३१०, प्रथमा ९६४ याप्रमाणे उमेदवारांची संख्या होती. प्रत्येक परीक्षेत उत्तीर्ण झालेले पहिले तीन उमेदवार पुढीलप्रमाणे :

**विशारद :** सुजाता यशवंत आफळे (पुणे), प्रतिभा प्रभाकर औटी (कोपरगाव), स्मिता शरद राजवाडे (रत्नागिरी)

**प्राज्ञ :** विजया उत्तमराव शहाणे, सीमा वसंतराव खेडकर, विजया ववनराव विलायते (सर्व श्रीरामपूर)

**प्रवेश :** अपर्णा चंद्रशेखर फणसे (वेडेकर विद्यामंदिर, ठाणे), माधुरी अरविंद गाडगीळ (नाशिक), जुई श्रीधर मेहेंदळे (टिळक विद्यामंदिर, डोंबिवली)

**प्रथमा :** शुभांगी देविदास कुलकर्णी (अंबेजोगाई), अर्चना अशोक सुलाखे (टिळक विद्यामंदिर, डोंबिवली), महेश वसंत अभ्यंकर (मालवण)

डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या संचालनाखाली या वर्षीचे परीक्षाकार्य सुरळीतपणे पार पडले. डॉ. श्रीलेखा साने, प्रा. आशा जोशी, प्रा. जयश्री पाटील, प्रा. मधुरा कोरान्ने, प्रा. आरती दातार, डॉ. व. न. कुबेर, डॉ. माधवी वैद्य, डॉ. अंजली कान्हेरे, डॉ. ललिता कुंभोजकर, डॉ. लीला दीक्षित, डॉ. सुप्रिया अत्रे, डॉ. सुचेता वैद्य, प्रा. शशिकला कांबळे, प्रा. सुषमा जोगळेकर, प्रा. अनिता मोडक, प्रा. शीला कोलटकर, डॉ. शैला काळकर, श्री. श्री. वा. कुलकर्णी, डॉ. कल्याणी दिवेकर यांचे या वर्षीच्या परीक्षाकार्यात आत्मीयतेचे सहकार्य लाभले.

परीक्षाकेंद्र चालवून हार्दिक सहकार्य देणाऱ्या केंद्रसंचालकांची परिषद आभारी आहे.

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका :**

'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' या परिषदेच्या वाङ्मयीन त्रैमासिकाचे चालू वर्षात ४ अंक प्रसिद्ध झाले. दीपावली अंक 'दलित साहित्य विशेषांक' म्हणून प्रसिद्ध झाला. डॉ. व. स. जोशी यांच्या संपादकीय कारकीर्दीत पत्रिका अंकाचा दर्जा सतत वाढता राहिला. अंकाचे स्वरूप सभासदांना आवडले.

## शाखासभा वृत्त :

### सांगली :

१) जुलै १९८७ मध्ये श्री. अनिरुद्ध कुलकर्णी यांचे 'नाटककार इब्सेन : व्यक्ती आणि विचार' या विषयावर श्रीमती मथुबाई गरवारे कन्या महाविद्यालय, सांगली येथे व्याख्यान झाले. अध्यक्षस्थानी शाखाध्यक्ष प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. कार्यवाह प्रा. सुभाष दगडे यांनी आभार मानले.

२) दि. २१ नोव्हेंबर १९८७ रोजी कै. श्री. म. माटे जन्मशताब्दी वर्षाच्या निमित्ताने डॉ. स. हृ. देशपांडे यांचे सांगली जिल्हा नगरवाचनालय, येथे 'श्री. म. माटे : व्यक्ती आणि विचार' या विषयावर व्याख्यान झाले. त्या प्रसंगी सांगलीतील नवोदित कादंबरीकार श्री. दादासाहेब मोरे ('गबाळ'कार) यांच्या 'दुष्काळ' या कादंबरीचे प्रकाशन डॉ. स. हृ. देशपांडे यांच्या हस्ते झाले. कादंबरीचा परिचय प्रा. वैजनाथ महाजन यांनी करून दिला. कादंबरीचे लेखक श्री. दादासाहेब मोरे यांनी आपले मनोगत मांडले. अध्यक्षस्थानी प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. कार्यवाह प्रा. सुभाष दगडे यांनी आभार मानले.

३) दि. २५ जानेवारी १९८८ रोजी म. सा. प. शाखा सांगली आणि गणेश वाचनालय, सांगली यांच्या संयुक्त विद्यमाने जी. ए. कुलकर्णी यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. या कार्यक्रमामध्ये प्रा. म. द. हातकणंगलेकर संपादित जी. ए. कुलकर्णी यांच्या निवडक कथांचा संग्रह 'डोहकाळिमा' या पुस्तकाचे प्रकाशन, पॉप्युलर प्रकाशन मुंबईचे श्री. रामदास भटकळ यांच्या हस्ते झाले. श्री. रामदास भटकळ व प्रा. म. द. हातकणंगलेकर यांनी आपली मनोगते मांडली. कै. जी. ए. कुलकर्णी स्मृतीस श्रद्धांजली म्हणून जी. ए कुलकर्णींच्या निवडक कथांच्या नाटय-वाचनाचा अभिनव कार्यक्रम श्री. पद्माकर गोवईकर यांनी सादर केला. कार्यक्रमाचे प्रास्ताविक प्रा. अविनाश सप्रे यांनी केले. अध्यक्षस्थानी प्रा. म. द. हातकणंगलेकर होते. कार्यवाह प्रा. सुभाष दगडे यांनी आभार मानले.

### जळगाव :

१) जळगाव जिल्हा पत्रकार संघाच्या पुरस्काराने, तसेच जळगाव जिल्हा साहित्यसंघ, महाराष्ट्र साहित्य परिषद, जळगाव शाखा, युवक बिरादरी, सहमंच जळगाव आणि अखिल भारतीय नाटयपरिषद, जळगाव शाखा यांच्या संयुक्त

विद्यमाने दि. ९।८।८७ रोजी क्रांतिदिनाच्या पार्श्वभूमीवर 'समाजापुढील आव्हाने' या विषयावर दैनिक 'लोकसत्ता'चे संपादक श्री. माधव गडकरी यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले होते.

२) आधुनिक मीरा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ख्यातनाम छायावादी हिंदी कवयित्री श्रीमती महादेवी वर्मा यांचे दि. ११।९।८७ रोजी दुःखद निधन झाले. त्याबद्दल त्यांना दि. १३ सप्टेंबर ८७ रोजी श्री. भागवत चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. शेवटी ठरावरूपाने दुखवटा व्यक्त करण्यात आला. त्यानंतर त्याच दिवशी आकाशवाणी जळगाव केंद्र येथील कृषी कार्यक्रम अधिकारी आणि सुप्रसिद्ध कथाकार श्री. शरदराव भोसले यांच्या कथाकथनाचा कार्यक्रम झाला.

३) नामवंत साहित्यिक व कार्यकर्ते डॉ. भीमराव कुलकर्णी तसेच मराठीचे प्राध्यापक श्री. म. वि. फाटक यांच्या निधनाबद्दल दि. १६।१०।८७ रोजी शोकसभा आयोजित करण्यात आली होती. जळगाव शाखेचे अध्यक्ष श्री. भागवत चौधरी सभेच्या अध्यक्षस्थानी होते. या प्रसंगी ज. वि. ऊर्फ राजा महाजन आणि प्रा. शरदचंद्र छापेकर यांची भाषणे झाली. शेवटी दुखवट्याचा ठराव संमत करण्यात आला.

४) बालगंधर्व जन्मशताब्दीनिमित्त दि. १७।१०।८७ रोजी 'मराठी नाट्यसंगीता'चा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. त्यात भुसावळ येथील सुप्रसिद्ध गायक कलाकार प्रा. एन. व्ही. पटवारी आणि श्री. राम चौसाळकर यांनी मराठी नाट्यसंगीताचा कार्यक्रम सादर केला. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक शाखा कार्याध्यक्ष प्रा. प्र. भ. चौधरी यांनी केले.

५) साप्ताहिक 'सोबत'चे संपादक, ख्यातनाम पत्रकार आणि ज्येष्ठ साहित्यिक श्री. ग. वा. बेहेरे यांचा 'साहित्यिक गप्पागोष्टी' चा कार्यक्रम महाराष्ट्र साहित्य परिषद, जळगाव शाखा, जिल्हापत्रकार संघ, मराठी साहित्य संघ, युवक बिरादरी, जिल्हा माहिती कार्यालय, नाट्यपरिषद जळगाव शाखा यांच्या संयुक्त विद्यमाने दि. १५ नोव्हेंबर रोजी आयोजित करण्यात आला होता.

## वाई :

**कै. पु. भा. भावे स्मृतिव्याख्यान : दि. १९।८।८७**

विदर्भ साहित्य संघाचे अध्यक्ष प्रा. राम शेवाळकर यांचे 'पु. भा. भावे यांचे कथासाहित्य' या विषयावर, पु. भा. भावे स्मृती-समितीमार्फत व्याख्यान आयोजित करण्यात आले. भावे यांच्या साहित्यातील काही सौंदर्यस्थळे दर्शवून प्राचार्य श्री. शेवाळकर यांनी, भावे हे नवकथेचे जनक कसे आहेत, याचे विवेचन केले. अध्यक्षस्थानी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी होते. आपल्या अध्यक्षीय भाषणात तर्कतीर्थ

अनुक्रमणिका

जोशी यांनी 'भावे हे सिद्धहस्त लेखक व लढवय्ये पत्रकार होते' असे उद्गार काढले. प्रास्ताविक श्री. अशोक भट यांनी केले. प्रा. श्रीपाद नानजकर यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. शेवटी प्रा.डॉ. सौ.नीलम हातेकर यांनी आभार मानले.

**वार्षिक सर्वसाधारण सभा : दि. २५।११।८७**

या सभेत विविध समित्या स्थापन करण्यात आल्या.

१) **कार्यक्रम समिती :** १) प्रा. श्रीपाद नानजकर (निमंत्रक) २) श्री. रा. पु. कोल्हटकर ३) अॅड. अशोक भट ४) श्री. पां. वा. नातू ५) डॉ. अ. वि. प्रभुणे ६) प्रा. सतीश सूर्यवंशी ७) श्री. प्रकाश जाधव

२) **भित्तिपत्रक समिती :** डॉ. अ. वि. प्रभुणे (निमंत्रक) २) श्री. शिवाजीराव सुतार ३) डॉ. सौ. नीलम हातेकर ४) श्री. वसंतराव वागडे.

३) **सभासद समिती :** केशवराव देवधर (निमंत्रक) २) श्री. प्रकाश जाधव ३) प्रा. रमेश डुबल ४) श्री. माणिकचंद ओसवाल ५) श्री. मधू नेने ६) सौ. मालतीबाई देशपांडे ७) श्री. भा. द. प्रभुणे.

**प्रा. मे. पुं. रेगे यांची प्रकट मुलाखत : दि. २।१२।८७**

नवभारत मासिकाचे संपादक प्रा. मे. पुं. रेगे यांना प्रकट मुलाखतीमध्ये विविध विषयांवर श्रोत्यांनी प्रश्न विचारले व त्यांची त्यांनी सविस्तर उत्तरे दिली. या कार्यक्रमात सौंदर्यशास्त्र, तत्त्वज्ञानाचा साहित्यावरील प्रभाव, दलित साहित्य या विषयांवर चर्चा झाली. अध्यक्षस्थानी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी होते.

**जी. ए. कुलकर्णी : भावांजली : दि. २२।१२।८७**

लोकमान्य टिळक ग्रंथालय सभागृहात 'कथाकार जी. ए. कुलकर्णी' या विषयावर झालेल्या व्याख्यानसत्रात प्रा. गो. म. कुलकर्णी, श्री. एस. डी. इनामदार, डॉ. पंडित टापरे यांची भाषणे झाली. दि. २९।१२।८७, **डॉ. सौ. नीलम हातेकर** यांचे 'परदेशस्थ भारतीयांचे कथासाहित्य' या विषयावर व्याख्यान झाले. मराठी साहित्यात अशा प्रकारचे लेखन हे प्रथमच होत असून मराठी कथासाहित्याचा पट व्यापक व समृद्ध होत असल्याचे त्यांनी सांगितले. अध्यक्षस्थानी डॉ. अ. वि. प्रभुणे होते.

**बालगंधर्व आणि मराठी रंगभूमी : दि. ११।४।८८**

या विषयावर प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी म. सा. प. पुणेतर्फे गणेश सर-

अनुक्रमणिका

प्रा. कुलकर्णी यांनी बालगंधर्व काळातील रंगभूमीची वैशिष्टये स्पष्ट केली. ॲड. अशोक भट यांनी प्रास्ताविक केले. डॉ. वसंत जोशी यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला व शेवटी प्रा.विजयकुमार फरांदे यांनी आभार मानले.

## लासलगाव :

महात्मा गांधी जयंतीदिनी स्थानिक कविसंमेलन आयोजित करण्यात आले. मुंबई येथील प्रसिद्ध कवयित्री सौ. तारा नरोन्हा ह्या प्रमुख पाहुण्या होत्या. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन चांदवडचे कवी प्रा. सतीश पिंपळगावकर ह्यांनी केले.

एप्रिल महिन्यात लासलगावातील उदयोन्मुख चित्रकार श्री. संजय वाघ ह्यांच्या देखण्या निसर्गचित्रांचे प्रदर्शन भरविण्यात आले. त्याचे उद्घाटन नासिकचे प्रख्यात चित्रकार श्री. शिवाजीराव तुपे ह्यांनी केले. कार्यक्रमाचे प्रमुख पाहुणे म्हणून श्री. द. भि. पाटील, श्री. सी. भा. होळकर हे उपस्थित होते. ह्या प्रसंगी प्राचार्य भा. वि. बेदरकर, श्री. ब. आ. संगवे, श्री. अ. व. पठाण ह्यांची समयोचित भाषण झाली. दोन दिवसांत ह्या प्रदर्शनाला लासलगावातील अनेक रसिक नागरिकां भेट देऊन या अभिनव उपक्रमाबद्दल आनंद व्यक्त केला.

परस्परगाठीभेटी व साहित्यचर्चा वर्षभर होत राहिल्या.

## जत (जिल्हा सांगली) :

दिनांक १४ डिसेंबर १९८६ रोजी स्थापन झालेल्या जत शाखेचे कार्य दुसऱ्या वर्षातही उत्साहाने सुरू राहिले. दिनांक २ डिसेंबर १९८७ रोजी नव्या वर्षासाठी कार्यकारिणी पुढीलप्रमाणे निवडण्यात आली–

अध्यक्ष– श्री. व्ही. एस्. खोचीकर, उपाध्यक्ष– श्री. पी. पी. कटरे,

कार्यवाह– डॉ. श्रीपाद जोशी,

सहकार्यवाह– श्री. पी. बी. पोतनीस, श्री. वाघमोडे टी. एम.

कोषाध्यक्ष– प्रा. व्ही. ए. रानडे.

सदस्य– प्रा. एस. बी. गायकवाड, श्री. उवाळेगुरुजी, श्री. गरांडे ए. के., प्रा. एस. पी. भिसाळ, श्री. के. डी. नागराळे.

शाखेचा पहिला कार्यक्रम प्रा. संजय गायकवाड यांच्या ‘कथा सुचते कशी या व्याख्यानाचा झाला. त्या दिवशी त्यांचा महाराष्ट्र शासनाच्या नवलेखक स्पर्धे तील ‘सांगावा’ कथासंग्रहास पुरस्कार मिळाल्याबद्दल जत वाचनालयाचे अध्यक्ष श्री. पी. डी. कटरे यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. शाखेचे सभासद श्री. के डी. नागराळे यांना स्फूर्तिगीत स्पर्धेत सांगली नगर वाचनालयात दुसरा क्रमां

मिळाल्याबद्दल त्यांचाही सत्कार करण्यात आला. शाखासभासद श्री. नेसूर यांनी दलित साहित्यावर लिहिलेल्या टिपणांवर दि. २।३।१९८८ रोजी विस्तृत चर्चा झाली. त्यात सर्व सभासदांनी भाग घेतला. शालेय, महाविद्यालयीन व खुल्या कथा-कथन स्पर्धेचा उपक्रम शाखेने आयोजित केला होता. त्यात ३५ स्पर्धकांनी भाग घेतला होता. रसिकांनीही गर्दी केली होती. परिषदेच्या वतीने चार गटांतील बारा स्पर्धकांना रोख बक्षिसे देण्याचा समारंभ दि. २ एप्रिल १९८८ रोजी श्री. वि. द. कयाळ यांच्या हस्ते संपन्न झाला. या प्रसंगी 'वास्तवरामायण' या विषयावर श्री. कयाळ यांचे चिंतनपर व्याख्यान झाले. याच समारंभात शाखेच्या वतीने दलित आत्मचरित्र लेखिका सौ. शांताबाई कृष्णाजी कांबळे यांचाही सत्कार करण्यात आला. जत शाखेचे सर्व कार्यक्रम जाहीर स्वरूपात गावातील जत वाचनालयात साजरे झाले. या सर्व कार्यक्रमांना रसिकांनी चांगला प्रतिसाद दिला.

## कोल्हापूर :

(१) **कै. वि. स. तथा भाऊसो खांडेकर स्मृतिदिन–** ११ सप्टें. ८७ रोजी वि. स. खांडेकर स्मृतिदिनानिमित्त डॉ. वापूजी संकपाळ यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. ल. रा. नासिराबादकर यांचे 'खांडेकरांची साहित्य विषयक भूमिका' या विषयावर अभ्यासपूर्ण व्याख्यान झाले. कविवर्य श्रीनिवास यादव यांच्या वि. स. खांडेकर गौरवगीतानंतर शाखाध्यक्ष चि. ह. भाटवडेकर यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. म. ग. पातकर यांनी शाखेच्यावतीने व प्रा. मधुमालती कोटिभास्कर यांनी खांडेकर कुटुंबियांच्या वतीने आभार मानले.

२) **कविवर्य रेंदाळकर : पुण्यस्मरण–** ३१ जानेवारी ८८ रोजी कै. कविवर्य रेंदाळकर जन्मशताब्दीनिमित्त 'कविवर्य रेंदाळकर पुण्यस्मरण' आयोजित करण्यात आले. शाखाध्यक्ष चि. ह. भाटवडेकर यांनी प्रास्ताविक केल्यानंतर डॉ. संकपाळ यांनी प्रमुख पाहुण्यांचा परिचय करून दिला. त्यानंतर प्रमुख पाहुणे कविवर्य कृ. ब. निकुंब यांनी कविवर्य रेंदाळकरांची काव्यक्षेत्रातील कामगिरी प्रतिपादन केली. त्यानंतर झालेल्या कविसंमेलनात प्रा. कृ. ब. निकुंब, प्रा. मंदा कदम, प्रा. राजन गवस, प्रा. प्रसन्नकुमार पाटील, सविता पारिजात, श्रीराम पचिंद्रे, अशोक भोईटे, प्रा. आनंदराव भोसले यांनी आपल्या कवितांचे वाचन केले. शेवटी कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांनी आभार मानले.

**सहभाग**

१) १५ नोव्हेंबर ८७ रोजी कविवर्य ए. पां. रेंदाळकर यांच्या रेंदाळ या

जन्मगावी झालेल्या कविसंमेलन व काव्यस्पर्धाप्रसंगी शाखा कार्यकारिणी सदस्य उपस्थित राहिले व कविवर्य रेंदाळकरांच्या घरी जाऊन त्यांच्या कुटुंबियांशी बातचीत केली.

२) १० जानेवारी ८८ रोजी दक्षिण महाराष्ट्र साहित्य सभेच्या वतीने गारगोटी येथे भरलेल्या ५ व्या दक्षिण महाराष्ट्र साहित्य संमेलनात शाखा सदस्य सहभागी झाले.

**अभिनंदन**

प्रा. वसंत कानेटकर यांची साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले. तसेच शाखा कार्यकारिणी सदस्य प्रा. प्रकाश कुंभार यांनी पीएच. डी. संपादन केल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

साहित्यसंस्कृती मंडळाच्या वतीने नवोदित लेखकांना देण्यात येणाऱ्या यशवंतराव चव्हाण वाङ्मय पुरस्कारासाठी सध्याचे शाखेचे कार्यवाह शशिकांत महाडेश्वर यांच्या ‘ग्रामीण शिक्षक : कथा नि व्यथा’ या पुस्तकाची व माजी कार्यवाह प्रा. अनिल पाटील यांच्या ‘बैलं’ या कथासंग्रहाची निवड झाल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

शाखा कार्यकारिणी सदस्य प्रा. चंद्रकुमार नलगे यांची म. सा. प. कार्यकारिणीवर कोल्हापूर-सोलापूर जिल्ह्याचे प्रतिनिधी म्हणून निवड झाल्याबद्दल त्यांचे अभिनंदन करण्यात आले.

**डॉ. भीमराव कुलकर्णी स्मारक निधी संकलन सहभाग—**

डॉ. भीमराव कुलकर्णी स्मारक निधीसाठी शाखेच्या कार्यकारी मंडळाच्यावतीने रु. ५०१।— पाठविण्यात आले.

**ढवळे ग्रंथयात्रा— वाचक पाहणी—**

मे ८८ मध्ये भरलेल्या ढवळे ग्रंथयात्रेच्या प्रसंगी प्रश्नावलीच्या आधारे सुमारे १००० वाचकांची पाहणी करण्यासाठी शाखा सदस्यांनी सहकार्य दिले. या वेळी सभासदनोंदणीही करण्यात आली.

**सभासद नोंदणी—**

अहवाल सालापूर्वी आजीव सहस्य ९४ होते. अहवाल सालात ५ नवीन आजीव सदस्य नोंदविण्यात आले. तसेच २८ सामान्य सदस्य नोंदविण्यात आले.

## श्रीरामपूर

३१ जानेवारी १९८७– सागर सौदागर यांचे 'सागरचंद्र' या पुस्तकातील कवितांचे वाचन.

२१ एप्रिल १९८७– डॉ. मंचरकर, सुमती लांडे यांचा सत्कार, काव्यवाचन व कार्यकारिणी बैठक.

३ ऑगस्ट १९८७– विनायक वंगाळ यांच्या 'मयत' कथेचे वाचन व चर्चा.

२८ ऑगस्ट १९८७– कार्यकारिणी बैठक व पावसाळी कवितांचे वाचन.

२५ नोव्हेंबर १९८७– म. सा. प. प्राज्ञ व विशारद परीक्षा उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांचे प्रमाणपत्र वितरण, प्रा. विजय कसबेकर यांचे कथाकथन, शिक्षकांचा सत्कार.

२४ फेब्रुवारी १९८८– कु. कोहली, श्री. अनिल कुलकर्णी व सौ. अनुराधा सोनावणे यांचे कथाकथन.

१२ एप्रिल १९८८– 'आठवणीतली कविता' चे वाचन व कार्यकारिणी बैठक.

१३ जून १९८८– म. सा. प. निवडणुकीच्या संदर्भात चर्चा.

४ ऑगस्ट १९८८– वार्षिक सर्वसाधारण सभा– सभेत १९८८ ते १९९१ या वर्षासाठी कार्यकारिणी निवडण्यात आली.

१० ऑगस्ट १९८८– कार्यकारिणी बैठक, वार्षिक कामकाजनियोजन आणि ॲड. रावसाहेब शिंदे यांचे 'एक होता कार्व्हर' या पुस्तकावर परीक्षण व चर्चा.

साहित्य परिषदेमार्फत घेतल्या जाणाऱ्या प्राज्ञ व विशारद या परीक्षांचे अभ्यासवर्ग चालविले व विद्यार्थ्यांची तयारी करवून घेतली. (ऑक्टोबर १९८७ ते डिसेंबर १९८७ अखेर) प्राज्ञ परीक्षेत सर्व केंद्रांत प्रथम-द्वितीय व तृतीय क्रमांकाने याच केंद्राचे विद्यार्थी उत्तीर्ण झाले.

शाखा अधिक कार्यरत व्हावी यासाठी म. सा. प., पुणे यांनी भरविलेल्या बैठकीत आम्ही विविध विधायक सूचना मांडल्या.

## ठाणे :

वर्षाच्या सुरुवातीलाच १२ जुलै १९८७ ला संस्थेच्या कार्यकारिणीच्या त्रैवार्षिक निवडणुका पार पडल्या. १ जुलै १९८७ ते ३० जून १९९० या तीन वर्षांकरिता पुढीलप्रमाणे, एकमताने निवड करण्यात आली :

१) श्री. चिं. शं. जोशी– अध्यक्ष.

२) ,, पी. सावळाराम– उपाध्यक्ष.

३) ,, म. पां. भावे– कार्याध्यक्ष.
४) ,, श्रीहरी भिडे– कोषाध्यक्ष.
५) ,, पद्माकर शिरवाडकर– कार्यवाह.
६) ,, अरुण मैड– कार्यवाह.
७) ,, चांगदेव काळे– सभासद.
८) ,, अशोक चिटणीस– ,,
९) ,, व्ही. सिन्नरकर– ,,
१०) ,, सौ. शीला मराठे– ,,
११) ,, सौ. शोभना सरवटे. ,,

प्रा. म. वि. फाटक, श्री. स. पां. जोशी व श्री. ग. ना. भिडे यांची सल्लागार म्हणून नियुक्ती करण्यात आली.

**श्रद्धांजली**

अहवाल सालात संस्थेचे संस्थापक व माजी अध्यक्ष प्रा. म. वि. फाटक यांचे २४ सप्टेंबर ८७ रोजी दुःखद निधन झाले. फाटक सरांनी आपली संस्था वाढविण्यासाठी अपार मेहनत केली. प्रकृती विघडलेली असतानादेखील, पर्वा न करता सभासद संख्या वाढविली. वाङमयीन परीक्षा चालू केल्या आणि ठाण्यातील साहित्य विश्वात भरीव कामगिरी केली. ६१ व्या अखिल भारतीय संमेलनाच्या, प्राथमिक तयारीच्या सुरुवातीसच फाटक सरांचे निधन व्हावे, हा शाखेला फार मोठा धक्का होता. त्यांच्या जाण्याने आमचा एक मार्गदर्शक हरपला, याचे अतिशय दुःख होत आहे. त्यांचे कार्य आम्हांला नित्य प्रेरणादायी ठरेल, असा विश्वास वाटतो.

**सभासद :**

अहवाल सालाअखेर, सभासदांची वर्गवारी खालीलप्रमाणे :

| सभासद | ३० जून ८७ अखेर | अहवाल सालात वाढ | कमी | ३० जून ८८ अखेर |
|---|---|---|---|---|
| आजीव | १०५ | १४ | १ | ११८ |
| साधारण | ३० | १० | २० | २० |

**कार्यक्रम**

| दिनांक | विषय/स्वरूप | पाहुणे/वक्ते | स्थळ |
|---|---|---|---|
| ११-८-८७ | मी आणि माझे लेखन | श्री. मधु मंगेश कर्णिक | मराठी ग्रंथ संग्रहालय, ठाणे |
| ८-५-८८ | नाटक असे जन्मा येते | श्री. सुरेश खरे | डॉ. बेडेकर विद्या मंदिर, |

| | | | |
|---|---|---|---|
| २४-६-८८ | क्रांतीच्या उंबरठ्या-वरील मराठी नाटक (संस्थेच्या ९ व्या वर्धापनानिमित्त)– | श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णी | मराठी ग्रंथ. संग्रहालय, ठाणे. |

ठाणे शाखेच्या आजीव सदस्या सौ. मंगला पेठे यांना चित्तपावन संघ नाशिक-तर्फे 'कै. ताम्हनकर स्मृती प्रीत्यर्थ श्री. गुरुदेव रानडे निबंध स्पर्धेत द्वितीय पारितोषिक मिळाले. त्यांचे शाखेतर्फे अभिनंदन.

वरील कार्यक्रमांशिवाय, या वर्षी शाखेने ६१ व्या अखिल भारतीय मराठी संमेलनाची जबाबदारी स्वीकारून, ते यशस्वीपणे पार पाडले. हे संमेलन १,२, व ३ जानेवारी १९८८ या कालावधीत संपन्न झाले.

**ऋणनिर्देश**

शाखेच्या विविध कार्यक्रमांच्या वेळी व अन्य साहित्यिक उपक्रमांत मराठी ग्रंथ संग्रहालय, ठाणे नगर वाचन मंदिर, डॉ. बेडेकर विद्या मंदिर, ठाणे महानगर-पालिका या संस्थांचे मोलाचे सहकार्य लाभले. तसेच ठाण्यातील सन्मित्र, ठाणे वैभव, कोकण सकाळ या दैनिकांनी आमच्या संस्थेच्या कार्यास वेळोवेळी प्रसिद्धी देऊन संस्थेवरील प्रेमच व्यक्त केले आहे. वरील सर्व संस्थांचे व संबंधित संपादकांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोत. याशिवाय संस्थेचे सभासद व अन्य संस्था, व्यक्ती– ज्यांनी आम्हाला सहकार्य केले, त्यांचेही आम्ही ऋणी आहोत.

**आवाहन**

अल्पावधीतच शाखेने जिल्हा संमेलन, विभागीय संमेलन, अखिल भारतीय संमेलन इत्यादी मोठाले उपक्रम यशस्वीरीत्या पार पाडले. साहित्य परिषदेच्या परीक्षांचे वर्गदेखील या शाखेतर्फे चालविले जातात. असे असताना शाखेला कार्यालयासाठी जागा नाही.

त्यामुळे कार्यकारिणीच्या सभा, छोट्या साहित्यिक बैठका घेण्यासाठी इतरांना विनंती करावी लागते. संस्थेची ही आवश्यकता लक्षात घेऊन, कार्यालयासाठी छोटी-मोठी जागा मिळविण्याच्या दृष्टीने प्रयत्न करणे आवश्यक आहे.

## खोपोली–

१) २०-४-८८ डॉ. बाबा आढाव– व्याख्यान, विषय– सामाजिक अंधश्रद्धा.
२) २६ जुलै– कै. र. वा. दिघे स्मृतिदिन– व्याख्यान डॉ. नीला पांढरे (धुळे)

## येवले—

या वर्षात शिवशाहीर बाबासाहेब पुरंदरे यांची 'राजा शिवछत्रपती' यांच्या जीवनावरील पाच दिवसांची व्याख्यानमाला शाखेने आयोजित केली होती. एक अविस्मरणीय कार्यक्रम ऐकल्याचे समाधान श्रोत्यांना मिळाले.

**निवडणूक :**

* * *

परिषदेच्या १९८८ ते १९९१ या कालावधीच्या त्रैवार्षिक निवडणुका सुव्यवस्थितपणे पार पडल्या. श्री. मो. रा. वाळंबे, प्राचार्य व. कृ. नूलकर व श्री. गोपाळराव पटवर्धन या तिघांच्या निर्वाचन मंडळाने निवडणुका योग्य रीतीने व ठरलेल्या कार्यक्रमानुसार पार पडण्यास मोलाचे साहाय्य केले. परिषद या निर्वाचन मंडळाची आभारी आहे.

**ऋणनिर्देश :**

परिषदेच्या कार्यकारी मंडळाने केलेल्या विविध कार्यांत अनेक व्यक्ती आणि संस्था यांचे सहकार्य लाभले. महाराष्ट्र राज्य शिक्षण खाते, ग्रंथालय-संचालनालय, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, विश्वकोश कार्यालय, पुणे महानगरपालिका तसेच परिषदेच्या साहित्यिक साहाय्य निधीस भरघोस देणग्या देणाऱ्या ठाणे महानगर पालिकेसारख्या संस्था व इतर सर्व देणगीदार, शाखा— सभा कार्यकर्ते, वृत्तपत्रे नियतकालिके, नव्याने झालेले आजीव, साधारण सदस्य व हितचिंतक या सर्वांचे आम्ही ऋणी आहोत.

**आपले**

**गं. ना. जोगळेकर** **ज्योत्स्ना देवधर** **वि. शं. जोशी**

**कार्यवाह**

## साभार स्वीकार

### धर्म, भाषाशास्त्र व इतर

१) सत्य रामायण : अच्युत रामशास्त्री; श्रीकांत कुलकर्णी, मु. पो.-मुंगावली (म. प्रदेश); १९८८ रु. ६०.

२) श्री करवीर माहात्म्य : गो. द. पतकी; पश्यंती प्रकाशन, कोल्हापूर; १९८८. रु. ७५.

३) मराठी शिका : रमेश धोंगडे व इतर; भाषाविज्ञान विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे ६; १९८८. रु. १००,

४) TATARICA : Lauri Kotiniemi; Annan katu 11 B 1500120 Heisink; 1987 (Aritcies ditcaing with Lingaistics).

५) देशाचे वाटोळे करणारी हिंदूंची रोगट ब्राह्मणी मनोवृत्ती : रमेश रघुवंशी; ग. वि. रघुवंशी, दादर, मुंबई २८; १९८८ रु. ३६.

६) जनूकाका (बाल कादंबरी) : वा. रा. सोनार; चेतश्री-प्रकाशन, अमळनेर; १९८८. (३ री आवृत्ती). रु. ६.

### पुरवणी यादी

१) **कॅनव्हास** : विलास गावडे; नयना पब्लि. ठाणे २; १९८८. रु. ८. (कविता)

२) **मागे वळून** : मथुताई आठल्ये; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३०; १९८८. रु. ३५ (आत्मचरित्र)

३) **सांगण्याजोगे** : डॉ. शांताबाई गुलाबचंद; श्री विद्या प्रकाशन, पुणे ३० १९८८; रु. ६० (आत्मचरित्र)

४) सर्वोत्कृष्ट मराठी कथा खं. ३ (पूर्वार्ध); राम कोलारकर–संपादित; छाया कोलारकर, पिंपरी, पुणे १८; १९८६; रु. ५०.

५) सर्वोत्कृष्ट मराठी कथा खं. ३ (उत्तरार्ध); राम कोलारकर– संपा. छाया कोलारकर, पुणे १८; १९८६; रु. ५५.

६) सर्वोत्कृष्ट मराठी कथा खं. ४ (भा. अ.); राम कोलारकर– संपा; छाया कोलारकर, पिंपरी, पुणे १८; १९८७; रु. ६०.

७) मात्तरं : गंगाधर ठाणगे; अजय प्रकाशन, मुलुंड (प.) मुंबई ८०; १९८८; रु. ४५. (कथा)

८) माणूस, शेती आणि पाणी : बापू उपाध्ये; श्री विद्या प्रका. पुणे ३०; १९८८. रु. ६० (प्रबंध)

९) गुजराती रंगभूमिनुं इतिहास दर्शन (खं. १); जयंतिलाल र. त्रिवेदी; गुजराती रंगभूमी इतिहास समिती, मुंबई; १९८४; रु. ४०.

# महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे

## दरवर्षी दिली जाणारी ग्रंथपारितोषिके

**कविता :**

१. कविवर्य कुसुमाग्रज पारितोषिक रु. १२००
२. महाराष्ट्रकवी यशवन्त पारितोषिक रु. ५०१
३. ह. स. गोखले पारितोषिक रु. ३००

**कथा–कादंबरी–प्रवास :**

४. शंकर पाटील पारितोषिक रु. २०००
(नवोदित कथाकार वा कादंबरीकारांसाठी)
५. आनंदीबाई शिर्के पारितोषिक (कथा) रु. १०००
६. वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) रु. १०००
७. नी. स. गोखले पारितोषिक (कथा) रु. ३००
८. ह. ना. आपटे पारितोषिक (कादंबरी) रु. १०१
९. दि. बा. मोकाशी पारितोषिक रु. ५००
(कथा, कादंबरी व प्रवास या प्रकारांना आलटून–पालटून)

**विनोदी वाङ्मय :**

१०. चिं. वि. जोशी पारितोषिक रु. १२००

**ग्रामीण साहित्य :**

११. ग. ल. ठोकळ पारितोषिक रु. १००१
(कथा, कादंबरी, कविता वा अन्य ग्रामीण प्रकार)

**समीक्षा :**

१२. प्रा. ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक रु. ५००

**इतिहास :**

१३. द. वा. पोतदार पारितोषिक रु. २५१

**संत वाङ्मय :**

१४. तुळशीरामजी वाघ पारितोषिक रु. ३००

**कोश, संदर्भात्मक साहित्य इ.**

१५. श्री. शां. हणमंते पारितोषिक रु. ३५०

**कुमार वाङ्मय :**

१६. वि. कों. ओक पारितोषिक रु. १०१
१७ सुशील प्रधान पारितोषिक रु. २००

**उत्कृष्ट प्रकाशनासाठी :**

१८. अ. स. गोखले पारितोषिक रु. ३००
१९. कुसुमाग्रज पारितोषिकप्राप्त पुस्तकाच्या प्रकाशकास रु. ९००
२०. चिं. वि. जोशी पारितोषिकप्राप्त पुस्तकाच्या प्रकाशकास रु. ९००

**ललितेतर, वैचारिक साहित्य :**

२१. विश्वनाथ–पार्वती गोखले पारितोषिक रु. १५०
२२. ना. गो. चापेकर पारितोषिक रु. २५०
२३. शि. म. परांजपे पारितोषिक रु. २५०
२४. श्रीगणेश-सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक रु. ५००
२५. श्रीगणेश-सरस्वती ठाकूरदेसाई पारितोषिक रु. ४००
(क्र. २४ व २५ ही दोन्ही एक वर्षाआड देण्यात येतात. १९८८-८९ या वर्षात हे पारितोषिक दिले जाणार नाही.)

**संपादित ग्रंथ :**

२६. गिरिजा-गंगाधर जांभेकर पारितोषिक रु. १०१

**दिवाळी अंक :**

२७. उत्कृष्ट दिवाळी अंकांसाठी
(तीन पारितोषिके–) प्रत्येकी रु. १०१
२८. अनंत काणेकर पारितोषिक रु. २००
(दिवाळी अंकातील उत्कृष्ट ललित लेखास)

**विशेष पुरस्कार :**

२९. म. सा. परिषद वर्धापन दिनानिमित्त (२७ मे) प्रदीर्घ वाङ्मयसेवेबद्दल ज्येष्ठ साहित्यिकास मानचिन्हासह समारंभपूर्वक दिला जाणारा पुरस्कार. रु. ३०००

३०. कै. प्रा. रा. श्री. जोग पारितोषिक : समीक्षा ग्रंथाच्या लेखकास अंदाजे रु. २००० व प्रकाशकास अंदाजे रु. ३००.

३१. कै. डॉ. भीमराव कुलकर्णी यांच्या स्मृत्यर्थ साहित्यसंस्थेतील कार्यकर्त्यास रु. १००१.

३२. साहित्यिक साहाय्य निधीच्या व्याजातून दरवर्षी अपंग, वृद्ध, निराधार किंवा रुग्ण साहित्यिकास मानधन.

**कृपया नोंद घेणे**

वरीलपैकी क्र. २९ (२७ मे.), क्र. १ मे (२७ फे.) क्र. २ (९ मार्च), क्र. ९ (२९ जून), क्र. १० (१९ जाने.), क्र. ११ (२२ जुलै), आणि क्र. १२ (५ मार्च) ही पारितोषिके कंसात दिलेल्या तारखांना समारंभपूर्वक दिली जातात.

परिषदेची इतर पारितोषिके वर्धापनदिनाच्या वेळी देण्याचा उपक्रम यावर्षी सुरू करण्यात आला आहे.

पारितोषिकांसाठी लेखकांनी वा प्रकाशकांनी पुस्तकाच्या दोन प्रती पाठवावयाच्या असतात. दिवाळी अंकांच्या तीन प्रती.

**पत्ता :** श्री. कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळकरस्ता, पुणे ४११०३० (दूरध्वनी ४४२९६३)

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे

## दरवर्षी होणारी व्याख्याने इ. कार्यक्रम

| | | |
|---|---|---|
| १) | र. वा. दिघे स्मृत्यर्थ (दोन व्याख्याने) | ५ जुलै |
| २) | वा. म. जोशी स्मृत्यर्थ व्याख्यान | २० जुलै |
| ३) | ग. ल. ठोकळ स्मृत्यर्थ (दोन व्याख्याने) | २२ जुलै |
| ४) | पु. भा. भावे स्मृत्यर्थ व्याख्यान इ. | १३ ऑगस्ट |
| ५) | संत सावतामाळी स्मृत्यर्थ (दोन व्याख्याने) | आषाढात |
| ६) | बालकवी स्मृत्यर्थ (दोन व्याख्याने इ.) | ऑगस्ट–सप्टें. |
| ७) | द. वा. पोतदार स्मृत्यर्थ व्याख्यान | ६ ऑक्टोबर |
| ८) | व. हृ. गोळे स्मृत्यर्थ (दोन व्याख्याने) | २६–२७ ऑक्टो. |
| ९) | माधव जूलियन स्मृत्यर्थ (व्याख्यान इ.) | २९ नोव्हेंबर |
| १०) | श्री. म. माटे स्मृत्यर्थ (व्याख्याने) | २५–२६ डिसेंबर |
| ११) | वि. द. घाटे स्मृत्यर्थ व्याख्यान | १८ जानेवारी |
| १२) | नरहर कुरुंदकर स्मृत्यर्थ व्याख्यान | १० फेब्रुवारी |
| १३) | पिलाजीराव फडणीस स्मृत्यर्थ (व्याख्यान इ.) | १६ फेब्रुवारी |
| १४) | ना. गो. चापेकर स्मृत्यर्थ व्याख्यान | ५ मार्च |
| १५) | बा. सी. मर्ढेकर स्मृत्यर्थ व्याख्यान | २० मार्च |
| १६) | ज्ञानकोशकार केतकर स्मृत्यर्थ व्याख्यान इ. | १० एप्रिल |
| १७) | सावित्रीबाई बार्लिंगे स्मृत्यर्थ (दोन व्याख्याने) | एप्रिल ते जून |
| १८) | म. सा. परिषद वर्धापन दिन समारंभ | २७ मे |
| १९) | नाथमाधव स्मृत्यर्थ व्याख्यान | २१ जून |
| २०) | का. र. मित्र स्मृत्यर्थ व्याख्यान | २३ जून |

**याशिवाय** : दिवाळीच्या आगेमागे का. र. मित्र यांचे स्मृत्यर्थ सप्ताहभर शारदीय–व्याख्यानमाला आणि श्रीगणेशासरस्वती ठाकूरदेसाई यांच्या स्मरणार्थ वर्षाआड पाच व्याख्याने; तसेच आवश्यक तेव्हा इतर सभा, परिसंवाद, कवि-संमेलन इ.

# परिषद् वार्ता

(१ जुलै १९८८ ते ऑगस्ट १९८८)

**कै. र. वा. दिघे स्मृतिदिन–**

कै. र. वा. दिघे यांच्या स्मृतिदिनानिमित्त ५ जुलै ८८ रोजी डॉ. सौ. रेखा इनामदार साने यांचे 'कादंबरी: प्रादेशिक-ग्रामीण-दलित' या विषयावर भाषण झाले.

**कै. वा. म. जोशी स्मृतिदिन–**

दि. २० जुलै ८८ रोजी कै. वा. म. जोशी स्मृतिदिनानिमित्त डॉ. अश्विनी धोंगडे यांचे 'स्मृतिलहरीतील वामन मल्हार' या विषयावर भाषण झाले.

**कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिन–**

दि. २२ जुलै ८८ रोजी कै. ग. ल. ठोकळ स्मृतिदिनानिमित्त डॉ. सुप्रिया अत्रे यांचे 'ग्रामीण कादंबरीकार ग. ल. ठोकळ' या विषयावर व्याख्यान झाले.

**श्री सावता महाराज व्याख्यानमाला–**

संतश्रेष्ठ सावता महाराज यांच्या स्मरणार्थ दि. ११ व १२ ऑगस्ट ८८ या दिवशी डॉ. अशोक कामत यांची अनुक्रमे 'संत नामदेव यांचे वेगळेपण' व 'गुरुनानक यांचे वाङमय' या विषयावर व्याख्याने झाली.

**श्री. शंकर पाटील कथा-कादंबरी पारितोषिक–**

दि. ८ ऑगस्ट ८८ रोजी १९८७ चे शंकर पाटील पारितोषिक श्री. शशांक ओक यांना 'अमुकचे स्वातंत्र्य' या कादंबरीबद्दल देण्याचा समारंभ पार पडला. परिषदेचे अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान यांच्या अध्यक्षतेखाली पारितोषिक व मानचिन्ह देण्यात आले. परीक्षकातर्फे डॉ. चंद्रशेखर बर्वे यांचे भाषण झाले.

**कै. पु. भा. भावे स्मृतिदिन–** दि. १७ ऑगस्ट रोजी पु. भा. भावे स्मृतिदिनानिमित्त डॉ. निर्मलकुमार फडकुले यांचे 'साहित्यिक पु. भा. भावे' या विषयावर व्याख्यान झाले. पुष्पगंधा मोघे व नंदकुमार केतकर यांचे नाटचदर्शन झाले. दिग्दर्शन विश्वास गाडे यांचे होते.

**कै. द. र. कवठेकर छायाचित्र अनावरण–**

दि. १६ ऑगस्ट ८८ रोजी सुप्रसिद्ध कादंबरीकार कै. दत्त रघुनाथ कवठेकर याच्या कुटुंबियांनी परिषदेस दिलेल्या छायाचित्राचा अनौपचारिक अनावरण समारंभ श्री. श्री. ज. जोशी यांचे अध्यक्षतेखाली पार पडला.

**भेटी-गाठी–**

'लोकसत्ता' चे संपादक श्री. माधव गडकरी यांनी परिषदेस दि. २३।८।८८ रोजी भेट देऊन परिषदेच्या कार्याची माहिती घेतली. अध्यक्ष प्रा. ग. प्र. प्रधान, कार्याध्यक्ष श्री. राजेन्द्र बनहट्टी, कोषाध्यक्ष श्री. म. श्री. दीक्षित, कार्यवाह डॉ. गं. ना. जोगळेकर, पत्रिका संपादक श्री. शंकर सारडा इत्यादींनी श्री. गडकरी यांचे स्वागत केले आणि त्यांच्याशी साहित्य विषयक मनमोकळी चर्चा केली.

**कार्यवाह**

## महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल ८

दिनांक ३० जून १९८८

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **विश्वस्तनिधी** | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४,००,६७८–४५ | ४,३८,२८२–४५ |
| आजीव सभासद (८७–८८) | ३७,६०४–०० | |
| **इतर राखीव निधी** | | |
| (अ) इमारत | | ८९,६४४–९४ |
| (ब) ग्रंथालय | | २३,५७३–१० |
| (क) वाङमयेतिहास योजना | | ३२,५८७–१६ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ६७,३००–०६ | |
| ८७–८८ मधील विक्री | १४,०८४–७५ | |
| ३०–६–८८ चा शि. साठा | ३१,९५८–९७ | |
| वजा १–७–८७ चा शि. साठा | ४९,५९४–६२ | |
| वजा ८७–८८ मधील खर्च | ३१,१६२–०० | |
| (ड) पारितोषिके व स्मृतिदिन निधी | | २,३२,१५६–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २,११,४६०–०० | |
| ८७–८८ मधील जमा | २०,६९६–०० | |
| **प्रॉव्हिडंड फंड खाते** | | २२,३७३–८२ |
| मागील ताळेबंदावरून | २०,३५७–०२ | |
| ८७–८८ मधील जमा | २,०१६–८० | |
| **साहित्यिक साहाय्य निधी** | ४४,८२५–०० | ९७,२५८–०० |
| ८७–८८ मधील जमा | ५८,४३४–०० | |
| | १,०३,२५९–०० | |
| वजा ८७–८८ खर्च | ६,००१–०० | |
| **इतर देणी** | | ४७,२९६–८७ |
| अनामत | | १०,०००–०० |
| ग्रंथालय अनामत | | २९,९५२–०० |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २६,१२२–०० | |
| ८७–८८ मधील जमा | ३,८३०–०० | |

अनुक्रमणिका






**परिषद, पुणे ४११ ०३०**

नियम (१) प्रमाणे

रोजीचा ताळेबंद

| जिंदगी व येणी | रु. पै. | | रु. पै. | |
|---|---|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | | ५६,४७८--५८ | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ५७,९२६–७५ | | | |
| वजा घसारा २.५ % | १,४४८–१७ | | | |
| **गुंतवणुका** | | | १,२१,५५०–०० | |
| (अ) कर्जरोखे दर्शनी किंमतीचे लोन १९८७ ३% | ५,३००–०० | | | |
| कन्व्हर्शन लोन | २,७००–०० | | | |
| (ब) शेअर्स सें. प्रा. रेल्वेज | २,३००–०० | | | |
| महाराष्ट्र स्टेट को. ऑप. बँक | १,२५०–०० | | | |
| (क) टेल्को रॉयल डिबेंचर्स | ६०,०००–०० | | | |
| (ड) महानगर टेलिफोन नियम | ५०,०००–०० | | | |
| **फर्निचर व डेडस्टॉक** | | | ९,३२४–७१ | |
| मागील ताळेबंदानुसार | १०,३६०–७९ | | | |
| ८७–८८ मधील खरेदी | -- | | | |
| वजा घसारा १०% | १,०३६–०८ | | | |
| **ग्रंथालय** | | | ३२,५४६–१० | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ३२,४३७–१३ | | | |
| अधिक ८७–८८ मधील खरेदी | ३,७२५–२० | | | |
| वजा घसारा १०% | ३,६१६–२३ | | | |
| **शिल्लक साठा** | | | ६७,५१०–३२ | |
| वाङ्मयेतिहास प्रकाशने | ३१,९५८–९७ | | | |
| संशोधन प्रकाशने | १२,८५१–१५ | | | |
| वजा मराठी फार्स | २२,७००–२० | | | |

| निधी व देणी | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **हिशेब तपासनीस** | | ५००–०० |
| **मराठी फार्स** | | १३,१८७–८३ |
| मागील ताळेबंदावरून– | १६,८१९–८३ | |
| ८७–८८ मधील विक्री | १११२–८० | |
| ३०-६-८८ चा शिल्लक साठा | २२७००–२० | |
| ८७–८८ मधील खर्च | १०४५–०० | |
| १-७-८७ चा शिल्लक साठा | २६४००–०० | |
| **साहित्य परिषद पारितोषिक निधी** | | ३,९१४–२५ |
| **संशोधन प्रकाशने–** | | |
| मागील ताळेबंदा प्रमाणे | ८,१४१–५७ | ६,१२०–२७ |
| ८७–८८ मधील विक्री | २०४२–५० | |
| ३०-६-८८ चे साठा | १२,८५१–१५ | |
| वजा– १-७-८७ चा साठा | १६,३२१–४५ | |
| वजा– ८७–८८ चा खर्च | ५९३–५० | |
| **अखेरच्या शिलका** | | ७५,३१३–५८ |
| बँक ऑफ बडोदा (करंट) | २४०४९–१९ | |
| बँक ऑफ महाराष्ट्र | २७५१३–४९ | |
| पुणे पिपल्स को. ऑफ. बँक (सा. सा. निधी) | २३७५०–९० | |
| | | ११,२२,१६०–२७ |

आमच्या आजच्या तारखेच्या रिपोर्टानुसार.
पाटणकर अँड असोसिएटस् चार्टंड अकौटंट्स करिता

पुणे,
दिनांक १-९-१९८८

एन्. सी. भळगट
भागीदार

अनुक्रमणिका

| जिंदगी व येणी | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| वीज बोर्ड अनामत– | | २६०–०० |
| आयकर वसुली | | ६,९१०–०० |
| इतर वेणी | | १३,४७४–२० |
| अॅडव्हान्स– | | २४३२–८४ |
| ठेवी– | | ४,६८,९००–०० |
| (अ) पारितोषिके व व्याजाचे | २५,५००–०० | |
| (ब) बँक ऑफ महाराष्ट्र ठेवी | २३,४००–०० | |
| (क) विश्वस्त ठेवी | २९२,५००–०० | |
| (ड) कार्यकारी मंडळ ठेवी | ५६,५००–०० | |
| (इ) स्टेट बँक ऑफ इंडिया ठेवी | ७०,०००–०० | |
| (फ) ग्रंथालय अनामत | १,०००–०० | |
| प्रा. फंड ठेवी– | | २२,३७३–८२ |
| ठेवी | ८२९४–०१ | |
| सेव्हिंग्ज खाते | +१४०७९–८१ | |
| तूट | | १५६०२९–७१ |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ११६,८४५–३४ | |
| ८७–८८ मधील तूट | ३९१८४–३७ | |
| अखेरच्या शिलका– | | १६४३६९–९९ |
| रोख | ४,०३७–१७ | |
| स्टेट बँक (वि) सेव्हिंग | ३९२८–९९ | |
| बँक ऑफ बडोदा (वि) सेव्हिंग | १५१५२५–४८ | |
| पुणे पिपल्स को. ऑफ बँक | ४८७८–३५ | ११,२२,१६०–२७ |

| | | |
|---|---|---|
| गं. ना. जोगळेकर | म श्री. दीक्षित | सर्जेराव घोरपडे |
| ज्योत्स्ना देवधर | कोषाध्यक्ष | मधुकर परांजपे |
| चिं. शं. जोशी | | वि. ग. माटे |
| कार्यवाह | | विश्वस्त |

अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य

शेड्यूल ११

दिनांक १-७-१९८७ ते

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
| --- | --- | --- |
| **मालमत्तेसंबंधी–** | | ३,६२३–०० |
| भुईभाडे, म्युनिसिपल कर | ६६९–०० | |
| विमा (ग्रंथालय) | ४०–०० | |
| जनरल मेन्टेनन्स | २९१४–०० | |
| **व्यवस्थापन–** | | ४७२३५–४० |
| पगार व प्रा. फंड | २३३७८–१० | |
| छपाई, टायपिंग व स्टेशनरी | ५,०५४–६० | |
| टपाल व दूरध्वनी | ९२६१–१० | |
| कार्यकारी मंडळ (प्रवासादी खर्च) | ४७४८–२५ | |
| प्रवास व प्रचार कार्य | ७००–०० | |
| वीज | ४,०९३–३५ | |
| **सभासद स्नेह संमेलन–** | | १८०–०० |
| वार्षिक निवडणूक खर्च | | १०,७०२–३५ |
| **हिशोब तपासनीस–** | | ९००–०० |
| **बँक कमिशन** | | ५३५–५० |
| **किरकोळ खर्च–** | | ६,०४२–५० |
| आतिथ्य | ५१६६–२५ | |
| विश्वस्त | ५००–०० | |
| इतर (किरकोळ) | ३७६–२५ | |
| **घसारा–** | | ६१००–४८ |
| इमारत | १४४८–१७ | |
| फर्निचर व डेडस्टॉक | १०३६–०८ | |
| ग्रंथालय | ३६१६–२३ | |

अनुक्रमणिका








**परिषद, पुणे– ४११ ०३०**

**नियम (१) प्रमाणे**

**दिनांक ३०-६-१९८८ या वर्षाचे उत्पन्नखर्च पत्रक**

| उत्पन्न | रु. पै. | रु. पै. |
|---|---|---|
| **व्याज–** | | ५२,९७७–३१ |
| सेव्हिंग्ज खात्यावरील | २४०९–३० | |
| ठेवींवरील व कर्जरोख्यावरील | ५०४५६–०१ | |
| डिव्हिडंड | ११२–०० | |
| **देणग्या–** | | ५३,०८३–०० |
| **अनुदाने–** | | २२,८१५–०० |
| ग्रंथालय | २५००–०० | |
| पत्रिका | ११,९००–०० | |
| वाङ्मयकोश | ८,४१५–०० | |
| विभागीय संमेलन | –– | |
| **इतर उत्पन्ने–** | | ३७,५०९–२० |
| परीक्षा शुल्क | १६६४२–०० | |
| इतर जमा | — | |
| साधारण सभासद वर्गणी | ८,०१०–०० | |
| पत्रिका वर्गणी व जाहिरात | १०२४८–२५ | |
| संलग्न संस्था वर्गणी | २०–०० | |
| प्रकाशने | १८२८–९५ | |
| वीज | ७६०–०० | |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | | |
| **पारितोषिक व स्मृतिदिन–** | | ७,६८३–९० |
| का. र. मित्र व्याख्यानमाला | ७०८०–०० | |
| सावित्रांबाई बार्लिंगे | ५००–०० | |
| मोकाशी पारितोषिक | १०३–९० | |
| अ. भा. म. सा. संमेलन, ठाणे, | | १०००–०० |
| **तूट–** | | ३९,१८४–३७ |

| खर्च | रु. पै. | रु. पै. |
| --- | --- | --- |
| संस्थेच्या उद्दिष्टांकरिता– | | १,३८,९३३–५५ |
| साहित्य व सांस्कृतिक कार्यक्रम | ८,९३४-७० | |
| महामंडळ (प्रवास व वर्गणी) | ४४९७–२५ | |
| शाखा-सभा वर्गणी हिस्सा | ७४११–०० | |
| पत्रिका (कागद, छपाई, टपाल इ.) | ६७९२७–९० | |
| ग्रंथालय (वेतन व इतर खर्च) | ९०९२–५० | |
| परीक्षा | १२७५५–१० | |
| वाङ्मयकोश खर्च | ५४३–०० | |
| इतर प्रकाशने | ५३४–७० | |
| पारितोषिके व स्मृतिदिन खर्च | २७,२३७–४० | |
| | | २१४२५२–७८ |

गं. ना. जोगळेकर
ज्योत्स्ना देवधर
वि. श. जोशी
कार्यवाह

म. श्री. दीक्षित
कोषाध्यक्ष

सर्जेराव घोरपडे
मधुकर परांजपे
वि. ग. माटे
विश्वस्त

| उत्पन्न | रु. | पै. |
|---|---|---|
| | २१४२५२–७० | |

पुणे, दिनांक १–९–१९८८
तपासले बरोबर आहे. आमच्या आजच्या तारखेच्या अहवालानुसार

एन. सी. भळगट
पाटणकर अँड असोसिएटस अकौंटंट्सकरिता

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य

**अर्थसंकल्प**

| खाते जमा | संकल्प १९८७–८८ रु. पै. | प्रत्यक्ष १९८७–८८ रु. पै. | संकल्प १९८८–८९ रु. |
|---|---|---|---|
| व्याज व डिव्हिडंड | ६०,०००–०० | ५२९७७–३१ | ६५,००० |
| साहित्यिक साहाय्य निधी व्याज | | | १४,००० |
| देणग्या (योगक्षेमार्थ) | ४५,०००–०० | ५३०८३–०० | ५०,००० |
| शासकीय अनुदान | १५,०००–०० | – | १०,००० |
| पुणे महा. पालिका अनुदान | ५०००–०० | – | ५,००० |
| सा. सं. मंडळ अनुदान पत्रिका | ६७५०–०० | ११९००–०० | १०,००० |
| ग्रंथालय अनुदान | २५००–०० | २५००–०० | २५०० |
| पत्रिका (वर्गणी-जाहिरात इ.) | ८०००–०० | १०२४८–२५ | १०,००० |
| वार्षिक सा. सभासद वर्गणी | १०,०००–०० | ८०१०–०० | ८००० |
| परीक्षा शुल्क | ८०००–०० | १६६४२–०० | १५,००० |
| संलग्नसंस्था वर्गणी | २००–०० | २०–०० | १०० |
| किरकोळ (रद्दी इ.) | १०००–०० | – | १००० |
| वीज | | ७६०–०० | |
| प्रकाशन | २०००–०० | १८२८–९५ | २००० |
| विभागीय सा. संमेलन | १०००–०० | १०००–०० | २००० |
| ग्रंथपारि. व स्मृतिदिन | ६०००–०० | ७५८०–०० | ६००० |
| तूट | ४८५५०–०० | | ३८४०० |
| | २,१९०००–०० | | २,३९,००० |

राजेंद्र बनहट्टी
कार्याध्यक्ष

म. श्री. दीक्षित
कोषाध्यक्ष

अनुक्रमणिका

**परिषद पुणे-४११ ०३०.**

**१९८८–८९**

| खाते खर्च | संकल्प १९८७–८८ रु पै. | प्रत्यक्ष १९८७–८८ रु. पै. | संकल्प १९८८–८९ रु. पै. |
|---|---|---|---|
| म. न. पालिका कर व भुईभाडे | १०००–०० | ६६९–०० | १००० |
| इमारत (देखभाल व विमा) | ३०००–०० | २९१४–०० | ३००० |
| फर्निचर व नवीन सामान | २०००–०० | – | २००० |
| पगार व प्रॉ. फंड | २५०००–०० | २३३७८–०० | २५००० |
| छपाई, टंकलेखन, स्टेशनरी | ६०००–०० | ५०५४–६० | ६००० |
| टपाल व दूरध्वनी | ६०००–०० | ९२६१–१० | १०००० |
| वीज | ५५००–०० | ४०९३–३५ | ५००० |
| कार्यकारी मंडळ (प्रवास) | ४०००–०० | ४७४८–२५ | ५००० |
| प्रवास व प्रचारकार्य | ५०००–०० | ७००–०० | ३००० |
| साहि. सांस्कृ. कार्यक्रम | १५०००–०० | ८९३४–७० | १०००० |
| पत्रिका-कागद, छपाई टपाल इ. | ६५०००–०० | ६७९२७–९० | ७०,००० |
| ग्रंथालय (खरेदी, वेतन इ.) | १५०००–०० | ९०९२–५० | १५,००० |
| परीक्षा | ८०००–०० | १२७५५–१० | १३,००० |
| शाखासभा (वर्गणी हिस्सा) | ४०००–०० | ७४११–०० | ८००० |
| महामंडळ (सभा व वर्गणी) | ३५००–०० | ४४९७–२५ | ३००० |
| आतिथ्य | ४०००–०० | ५१६६–२५ | ३००० |
| संशोधन | १०००–०० | ५९३–५० | १००० |
| ग्रंथपारि, स्मृतिदिन इ. | २५०००–०० | २७२३७–४० | ३०,००० |
| हिशोबतपासनीस | १०००–०० | ९००–०० | १००० |
| किरकोळ | १०००–०० | ३७६–२५ | १००० |
| प्रकाशने | १०००–०० | ५३४–७० | १००० |
| विभागीय सा. संमेलन | १०००–०० | – | १००० |
| घसारा | ६०००–०० | ६१००–४८ | ६००० |
| विश्वस्त व्यवहार | १०००–०० | ५००–०० | १००० |
| निवडणूक | १०,०००–०० | १०७०२–३५ | १००० |
| साहित्यिक साहाय्य | | | १४००० |
| | २,१९,०००–०० | | २,३९००० |

**गं. ना. जोगळेकर**
कार्यवाह

**ज्योत्स्ना देवधर**
कार्यवाह

**चिं. शं. ओशी**
कार्यवाह

अनुक्रमणिका







महाराष्ट्र साहित्य पत्रिका

# दिवाळी अंक १९८८

थाटामाटात प्रसिद्ध होणार !

## माझा वाङ्मयीन ऋणानुबंध

या विषयावरील
महाराष्ट्रातील नामवंत
साहित्यिकांची मनमोकळी निवेदने

- गोपीनाथ तळवलकर : प्रा. श्री. के. क्षी.
- द्वा. भ. कर्णिक : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
- डॉ. द. भि. कुलकर्णी : राम कोलारकर
- माधव गडकरी : मधु मंगेश कर्णिक
- डॉ. यू. म. पठाण : डॉ. निर्मलकुमार फडकुले आर्दीचे चौकूट
- प्रा. म. द. हातकणंगलेकर : मित्रवर्य स्वामी
- प्रा. बा. ह. कल्याणकर : नरहर कुरुंदकर
- डॉ. आनंद यादव : श्री. पु. भागवत

शिवाय

ग. वा. बेहेरे, श्री. ज. जोशी, दादूमिया, प्र. श्री. नेरूरकर, जयवंत दळवी, सुभाष भेंडे, डॉ. सुनील सुभेदार, विजय कुवळेकर (संपादक 'सकाळ'), विद्याधर पुंडलिक, रवींद्र पिंगे इ.

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे संपादक शंकर सारडा आपल्या पत्रात लिहितात :

विश्वास पाटील यांच्या 'पानिपत' या कादंबरीचे आपण पाठवलेले हस्तलिखित वाचले. युद्ध हा महाकाव्याचा विषय.

युद्धाचे हें महाकाव्यसदृश्य प्रलयंकार रूप 'पानिपत' या कादंबरीत विश्वासार्ह पातळीवर प्रकट होते. मराठीत पहिल्यांदाच म्हणावे इतक्या ताकदीने, आणि संपूर्ण भारताचा तत्कालीन राजकीय पट उलगडून दाखवते.

'स्वामी' नंतरची हीच एक अशी ऐतिहासिक कादंबरी की जी छोट्यामोठ्या तपशिलांबाबतही एतिहासिक कागदपत्रांचा घट्ट आधार घेते. पन्नासावर व्यक्तिरेखा असूनही प्रत्येक व्यक्ती स्वतःचे रंगरूप घेऊन ठाम उभी राहते.

एतद्देशीय आणि परकीय यांच्यातील हा तुल्यबळ रणसंग्राम कौरव-पांडव युद्धासारखा घनघोर; भाऊसाहेबांना हे उमगले; पण त्यांच्या सरदारदरकदारांना नाही. त्या दुर्दैवी इतिहासाचे विस्मरण होऊ देणे आत्मघातकीपणाचे आहे हे भान ही कादंबरी देते. म्हणूनच प्रत्येक मराठी माणसाच्या घरात ती जायला हवी.




**लेखक : विश्वास पाटील**

रवींद्र मेस्त्री यांच्या अभिजात कुंचल्यातून उतरलेले अप्रतिम मुखपृष्ठ

पृष्ठे : सुमारे ६५० प्रसिद्धी : दिवाळी

किंमत १५० रु. १५ सप्टेंबरपूर्वी सवलतीची किंमत रु. ९५. (टपाल खर्च ५ रु. वेगळा) नोंदणी गावातील सर्व प्रमुख विक्रेत्यांकडे चालू.

**रुपये १०० ड्राफ्ट, मनिऑर्डरने 'राजहंस प्रकाशन' च्या नावे पाठवा; पुस्तक घरपोच मिळेल.**

**राजहंस प्रकाशन, १०२५ सदाशिव पेठ, पुणे ४११०३०**

**वा. द. गोडे, ४१ भवानी शंकर रोड, चितळे पथ कॉर्नर, दादर, मुंबई ४०००२८.**